॥ श्री ॥

# चांगदेव वटेश्वर कृत तत्वसार.



संपादक

डॉ. ह. रा. दिवेकर,

साहित्याचार्य, एम्. ए., डी. लिट्.



---

रा. ब. लक्ष्मण भास्कर मुळे

यांच्या

प्राक्कथनासह.






---

प्रकाशक

प्राच्य ग्रंथसंग्रहालय--उज्जयिनी.

आलीजाह दरबार प्रेस,--ग्वाल्हेर.



किंमत रु० १.

॥ श्री ॥

# प्राक्कथन.

ग्वाल्हेर संस्थानांतील प्रजाजनांचें अनेक प्रकारें हित करणाऱ्या व आपल्या राज्यांत भिन्न भिन्न प्रकारच्या जनहितकारक संस्था स्थापन करणाऱ्या आमच्या कै० माधवराव महाराजांच्या मनांत प्राचीन ग्रंथांचा संग्रह करण्याची कल्पना बरीच वर्षें घोळत होती. परंतु त्यांच्या कार्यबाहुल्यामुळें त्यांच्या हयातींत या कल्पनेस मूर्त स्वरूप येऊं शकलें नाहीं. निर्घृण काळानें त्यांना या लोकांतून अकालींच उचलून नेल्यानें त्यांच्या अशा कित्येक कल्पना अमूर्तावस्थेंतच राहिल्या असतील. प्रस्तुत "प्राच्य ग्रंथसंग्रहा" ची योजनाही, त्यांच्या पश्चात् त्यांच्या ज्या कांहीं अपूर्ण राहिलेल्या आकांक्षा कौन्सिलनें यथामति व यथाशक्ति पूर्ण करण्याचा प्रयत्न केला, त्यांपैकीं एक होय.

हा संग्रह कोठें करावा याविषयीं बरेच दिवस विचार चालला होता. त्यांत या संग्रहास, अत्यंत प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेली, एका काळीं सर्व विद्यांचें व विशेषतः ज्योतिष विद्येचें आद्यपीठ म्हणून नांवाजलेली, सप्त पुरींत अग्रगण्य असलेली, पवित्र उज्जयिनी नगरी योग्य वाटली व त्याप्रमाणें हें ग्रंथ संग्रहालय उज्जयिनीस स्थापन करण्याचें ठरविण्यांत आलें आणि पुढें सन १९३१ या वर्षीं बडोदे संस्थानचे अधिपति श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनीं उज्जयिनीस भेट दिली तेव्हां त्यांनींहि पण, या कार्यास हेंच स्थल योग्य अशी आपली संमति दर्शविली.

वरील ठरावाप्रमाणें उज्जयिनीस या संग्रहालयाची स्थापना आरंभीं शहरांत एका मध्यवर्तीच्या ठिकाणीं करून त्यासाठीं सोळा सभासदांचें एक व्यव-[illegible] मंडळ नेमण्यांत आलें. "अल्पारंभः क्षेमकरः" या न्यायानें पहिलीं दोन वर्षें त्याचें कार्य बहुतेक सावकाशच चाललें होतें. पुढें सन १९३३ सालीं या संस्थेचें चालकत्व श्रीयुत केशवराव डोंगरे यांचे हातीं आलें व त्यांनीं आपल्या धडाडीच्या स्वभावास अनुसरून या कार्यास जोराचा चालना दिली. सभासद,

ग्रंथ–निरीक्षक व संरक्षक, यांची निवड वगैरे सर्वच बाबतींत त्यांनीं सुधारणा घडवून आणली असून हल्लीं संग्रहालय स्थानीय माधव कॉलेजच्या दिवाणखान्यांतील प्रशस्त ग्यालरींत नेलें आहें आणि संग्रहांतील ग्रंथां संरक्षणाचें काम ओघानेंच कॉलेजचे प्रिंसिपॉल श्रीयुत ताटके यांच्या कडे सोंपविण्यांत आलें असून तेव्हांपासून या संस्थेची सारखी भरभराटच होत आहे. आज या संग्रहालयांत ग्रंथांची संख्या सुमारें पांच हजारांवर गेली आहे.

या संग्रहालयाच्या स्थापनेचे मुख्य उद्देश तीन आहेत :—

(१) शंभर वर्षा पूर्वींचे संस्कृत, मराठी, पारशी व अरबी हस्तलिखित ग्रंथ एकत्र करावे, (२) जिज्ञासु अभ्यासकांना हवा तेव्हां त्यांचा उपयोग करून घेतां यावा, आणि (३) अप्रसिद्ध पण महत्वपूर्ण अशा ग्रंथांचें प्रकाशन व्हावें, हे ते उद्देश होत. ज्ञानाभिवृद्धीच्या दृष्टीनें हे तिन्ही उद्देश अत्यंत लोकोपकारक आहेत हें सांगावयास नकोच.

ग्रंथांचा संग्रह करण्यास सुरुवात केली तेव्हां छापवून प्रसिद्ध करण्यास योग्य असे कितीसे ग्रंथ सांपडतील याविषयीं शंकाच होती. परंतु जसजसे ग्रंथ हस्तगत होत गेले तसतशी ही शंका निवृत्त होऊन अशा प्रकारचे ग्रंथ बरेच दिसूं लागले. ज्या ग्रंथाविषयीं हें "प्राक्कथन" आम्हीं लिहीत आहोंत तो ग्रंथ याच मालिकेंतला होय. तो नुसता अप्रकाशितच नव्हे तर अलभ्यहि पण आहे.

मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध संत—कवी श्रीज्ञानेश्वर महाराज यांचे किंवा (श्रीयुत पांगारकरांच्या लेखाप्रमाणें) त्यांच्या कनिष्ठ भगिनी श्रीमुक्ताबाई यांचे उपदेशित योगिराज वटेश्वर चांगदेव (चांगा वटेश्वर) हे या ग्रंथाचे कर्ते होत. मराठी वाङ्मयांत या ग्रंथाचें नांवदेखील कोणास माहित नव्हतें, व त्यामुळें उपोद्घातांत लिहिल्याप्रमाणें सरस्वतीच्या महाराष्ट्रीय भक्तांतून या ग्रंथकाराची बहुतेक उचलबांगडीच झालेली होती. परंतु हा ग्रंथ उपलब्ध झाल्यावर त्या संबंधानें येथील उत्साही साहित्यसेवक डॉ. दिवेकर यांनीं एक त्रोटक लेख केला व त्यावरून श्रीयुत पांगारकरांनीं आपल्या "मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत" या ग्रंथाचा आदरपूर्वक उल्लेख करून ग्रंथकाराचा गौरवहि केला आहे. हल्लीं सांपडलेला हा ग्रंथ त्रुटित आहे, पण तो प्रसिद्ध झाल्यावर संपूर्ण ग्रंथ मिळण्याचाहि संभव आहे.

या संग्रहालयाची आतां कायमची व्यवस्था सरकारांतून झाली असून राज्यांतील लोकांकडे गाबाळांत पडल्यामुळें मागें पुढें नष्ट होणारे व तसेच मालकांस तादृश उपयोग नसूनहि नुसते जतन करून ठेविलेले प्राचीन दुर्मिळ ग्रंथ, मालकाच्या इच्छेप्रमाणें बिनामूल्य किंवा योग्य मोबदला देऊन हस्तगत केले आहेत. तसेंच राज्याबाहेर जालवण, गुलसराय, मीरट, बनारस, पुणें, त्रावणकोर, या ठिकाणांहूनही असे अनेक ग्रंथ मिळविले आहेत व पुढेंही मिळविण्याचे प्रयत्न चालू आहेत. तरी पण ग्रंथ संग्रहालय म्हटलें कीं त्याला असे ग्रंथ मिळतील तितके मिळविण्याची इच्छाही नेहमीच असावयाची, ही गोष्ट उघड होय. यास्तव ज्यांच्या संग्रहीं अशा प्रकारचे प्राचीन ग्रंथ असतील त्यांनीं ते वर सांगितल्याप्रमाणें फुकट अथवा योग्य किंमत घेऊन देण्याची कृपा केल्यास त्यांचा संग्रहालयांत साभार स्वीकार केला जाईल.

तूर्त संग्रहालयांतील संग्रहीत ग्रंथांपैकीं प्रस्तुत "तत्वसार" हा पहिलाच ग्रंथ प्रकाशित होत आहे, व त्यासंबंधानें आवश्यक असलेली सर्व माहिती संपादकानें उपोद्घातांत व टीपांत दिलेलीहि आहे तेव्हां त्याविषयीं येथें विशेष लिहिण्याचें अर्थातच कांहीं प्रयोजन नाहीं. साहित्यप्रेमी लोकांकडून त्याचें अवश्य स्वागत होईल असा भरवसा वाटतो.

सरते शेवटीं, ज्या कौन्सिलनें या संग्रहालयाची सर्व व्यवस्था करून हा ग्रंथ प्रसिद्धीस आणण्याची संधि दिली त्यांचे आभार मानणें उचित होय. वस्तुतः या ग्रंथाच्या प्रकाशनाचें श्रेय लवकरच आपल्या राज्याचीं सूत्रें हातीं घेणाऱ्या आमच्या महाराजांकडे आहे. त्यांनीं दिलेल्या उत्तेजनामुळें हें काम अगोदर हातीं घेऊन तें शेवटास नेतां आलें आहे, हें सांगण्यास आनंद वाटतो, व म्हणूनच त्यांच्या कारकिर्दींत या संग्रहालयाचें कार्य चांगलें वाढीस लागेल व अधिक चांगलें होईल अशी दृढ आशा आहे.

मुक्काम लष्कर, ग्वाल्हेर, मंगळवार,
ज्येष्ठ वद्य १२, शके १८५८, ता. १६
जून सन १९३६.

ल. भा. मुळे,
शिक्षण मंत्री.

# चांगदेव वटेश्वराचा " तत्वसार. "

## उपोद्घात

सन १९३३ च्या आक्टोबरमधील गोष्ट. ग्वाल्हेर सरकारनें सुरू केलेल्या प्राच्यवाङ्मय ग्रंथसंग्रहालयाचें काम चालविणाऱ्या श्री. के. ब. डोंगरे यांचे घरीं कांहीं जुन्या पोथ्या पहात असतांना एका वाण्याकडून रद्दी म्हणून विकत आणलेल्या एका गट्ठ्यांतलीं दोन पानें माझ्या दृष्टीस पडलीं. त्यांतील मजकूर ओंवीबद्ध असून त्यांची भाषा जुन्या वळणाची वाटल्यानें मी कारकुनास त्याच प्रकारचीं सगळीं पानें गोळा करावयास सांगितलीं. शेवटलें पान पहातां पहातां 'श्रीवटेश्वरार्पणमस्तु' हा शेवट पाहून थोडें आश्चर्य वाटलें. "ऐसी चतुर्विध भक्ती रसाळ। वोविया दसाउशत रत्नमाळ। वाइली वटेश्वर चरणयुगळा। चांगा म्हणे" ही शेवटली ओंवी पाहून उत्सुकता वाटली व "शके चौतिसें बारा। परिधावी संवत्सरा। मार्गशिर शुद्ध तीज रविवार। नाम संख्य।" ही ओंवी वाचून ज्ञानेश्वर समकालीन चांगदेवाचाच हा ग्रंथ असावा ही खात्री वाटून विलक्षण आनंद झाला. हा ग्रंथ पुरा मिळावा म्हणून पुष्कळ खटपट केली पण ती सिद्धीस गेली नाहीं. नागपूर येथें सन १९३३च्या अखेरीस जें मराठी साहित्य संमेलन झालें त्यांतील प्रदर्शनांत या ग्रंथाचीं जितकीं पानें मिळालीं तितकीं ठेवलीं व प्रो. पोतदारांसारख्या इतिहास संशोधकांची ग्रंथाच्या प्राचीनत्वाबद्दल खात्री झाल्यावर प्राच्य ग्रंथसंग्रहालयाच्या ग्रंथमालेंत प्रथम पुष्प म्हणून या त्रुटित ग्रंथाचें प्रकाशन व्हावयाचें ठरलें. त्याप्रमाणें हें खंडित कां होईना पण दुर्मिळ पुष्प आज महाराष्ट्र रसिकांपुढें सादर केलें जात आहे.

जुन्या ग्रंथांचा कोठें, केव्हां व कसा शोध लागेल, हें सांगतां येत नाहीं. आतांच पहाना, तापी तीरीं राहणारा चांगदेव कोठें व महाराष्ट्रापासून दूर अंतरावर

असलेल्या ग्वाल्हेरींतील एक वाणी कोठें ? आजपर्यंत अशा वाण्यांकडे आलेल्या किती तरी पोथ्या तुकडे होऊन पुड्या बांधण्याचे कामीं आल्या असतील किंवा भिजवून कुटल्या जाऊन त्या रांध्याच्या टोपल्या होण्याचे कामीं लागल्या असतील ? 'भग्न पृष्ट कटि ग्रीव' होऊन लेखकानें पोथी लिहावी, पण तिची किंमत नसणाऱ्यांच्या हातीं पडून तिची अशी दुरावस्था व्हावी, याहून दुसरें दुर्दैव तें कोणतें? पण आनंदाची गोष्ट आहे कीं उशीरानें कां होईना आम्हां लोकांचे डोळे उघडत आहेत व दिवसेंदिवस असे ग्रंथ नष्ट होण्याची भीति कमी होऊन ते संशोधकांचे हातीं पडण्याचा संभव अधिकाधिक होत आहे.

या तत्वसाराची पोथी १०″×५″ आकाराच्या जाड दुपदरी कागदावर काजळी शाईनें लिहिली आहे. प्रत्येक पृष्ठावर अकरापासून चौदापर्यंत ओळी आहेत, म्हणजे सामान्यतः प्रत्येक पृष्ठावर बारापासून पंध्रापर्यंत ओंव्या आहेत. दोन्ही पृष्ठें मिळून एका पत्रावरील ओंवीसंख्या पंचवीस ते बत्तीस आहे. मूळ लेखकानें या पोथीचीं अशीं छत्तीस पत्रें लिहिलीं. पण त्यांपैकीं फक्त पंधरा उपलब्ध झालीं. उपलब्ध पत्रें पुढीलप्रमाणें :—

| पत्रांक. | पृष्ठें. | ओंवी संख्या. | |
|---|---|---|---|
| १ | १ | १— १३ = | १३ |
| २१ ते ३० | २० | ५९०— ८८१ = | २९२ |
| ३२ व ३३ | ४ | ९१२— ९६५ = | ५४ |
| ३५ व ३६ | ४ | ९९२—१०३६ = | ४५ |
| १५ | २९ | | ४०४ |

लेखकानें ही पोथी १४८३ शकांत दुर्मति संवत्सरीं आषाढ शुद्ध १ शुक्रवारीं पाथरी मुक्कामीं लिहिली आहे. लेखकाचें नांव बोप्प पाठक असें आहे.

पत्र नं. ३६ वर मूळ लेखकानें आपलें नांव, गांव व लेखनकाल सांगितला आहे. वटेश्वराचा शिष्य चांगदेव हा या तत्वसाराचा लेखक असून ग्रंथाचा लेखनकाल शालिवाहन शक १२३४ परिधावी संवत्सर आहे. हरिश्चंद्र नांवाच्या

पर्वतावर जेथून मंगळगंगा नांवाची नदी निघते व जेथील महादेवाची केदारेश्वराशीं तुलना केली जाते त्या ठिकाणीं मार्गशीर्ष शुद्ध ३ रविवारीं ग्रंथ समाप्त झाला आहे. श्रीयुत ल. रा. पांगारकर यांच्या मतानें 'नगर जिल्ह्यांत आकोलें तालुक्यांत एक हरिश्चंद्राचा डोंगर आहे, तेंच हें स्थान असावें'. पण याबद्दलचा कायम निश्चय अजून झालेला नाहीं.

ग्रंथाचा रचणारा चांगदेव वटेश्वर याबद्दल महाराष्ट्र सारस्वत लेखक कै० भावे यांनीं असें म्हटलें होतें कीं "याच (ज्ञानेश्वर) काळाच्या ग्रंथकारांपैकीं ज्याचें नांव मात्र सर्वत्र प्रसिद्ध आहे पण ज्याचे ग्रंथ फार उपलब्ध नाहींत असा चांगदेव हा ग्रंथकार होय." व "उत्तर पंचविशी या नांवाचें एक प्रकरण, एक आरती व सुमारें पांच पंचवीस अभंग इतकीच याची कृति हल्लीं उपलब्ध आहे." ही कृति अत्यंत थोडी व तीही पूर्णविश्वासार्ह अशी नसल्यामुळें महाराष्ट्र सारस्वताच्या नवीन आवृत्तींतून या ग्रंथकाराची उचलबांगडी झाली. चांगदेवाचे ग्रंथ एकनाथांस चांगलेच माहीत असावेत असें त्यानें आपल्या भागवताचे आरंभींच लिहिलेल्या "वंदूं प्राकृत कवीश्वर। निवृत्ति प्रमुख ज्ञानेश्वर। नामदेव चांगदेव वटेश्वर। ज्यांचें भाग्य थोर गुरु कृपा।। जयांचे ग्रंथ पाहतां। ज्ञान होय प्राकृतां। तयांचे चरणीं माथा। निजात्मता निजभावें।।" या ओंव्यावरून स्पष्ट दिसत आहे. पण हा ग्रंथ जर मिळाला नसता तर चांगदेवाचें नांव महाराष्ट्र सारस्वतांतून हळू हळू लुप्त झालें असतें. पण हा मिळाल्यावर आतां तसें होण्याची भीति राहिली नाहीं. श्री. पांगारकर यांनीं आपल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ ला—ज्ञानेश्वर नामदेवांचा काल' या ग्रंथांत जरी चांगदेवाचें वर्णन ग्रंथकार म्हणून केलेलें नसलें, तरी बडोद्याच्या सहविचार त्रैमासिकांत वर्ष १२, अंक ४ यांत यावर एक लेख प्रसिद्ध झाल्यानंतर आपल्या 'एकनाथ तुकारामांचा काल' या दुसऱ्या खंडांत ६ पानें चांगदेव वटेश्वराच्या तत्वसारावर प्रसिद्ध करून चांगदेवास मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत पुन्हा स्थान दिलें आहे.

याच खंडांत केलेल्या एका विधानाबद्दल मात्र थोडें लिहिलें पाहिजे. पृष्ठ ३ वर श्री. पांगारकरांनीं लिहिलें आहे कीं चांगदेव याचेंच चक्रपाणि हें दुसरें नांव असावें. पण तें बरोबर वाटत नाहीं. सिद्धपंथ सांगतांना चांगदेव वर्णन

करितात—"श्रीमुक्तादेवी योगिनी। जे समस्त सिद्ध शिरोमणि। तिये प्रसादें चक्रपाणि। ज्ञान सिद्ध।" आपल्या स्वत:चा उल्लेख चांगदेवानें या प्रकारें केला असेलसें वाटत नाहीं. शिवाय चक्रपाणि हें नांव वटेश्वराचे शिष्य म्हणजे मुक्ताबाई-चे प्रशिष्य म्हणून शिवकल्याणस्वामींनीं आपल्या गुरुपरंपरेंत स्वतंत्र दिलें आहे, व तेथें चांगदेवाचा उल्लेख नाहीं. शिवकल्याणस्वामी म्हणतात—"तो तैसाचि रस वोसंडला। तव मुक्ताबाई प्रकाशला। प्राशुनि तैसाचि उरला। श्री वटेश्वरा दिधला तो॥ वटेश्वराहुनी चक्रपाणी। लाधले हे अमृतसंजीवनी। विमलानंदी तेथुनी। लाधते झाले॥" आणि या परंपरेचा उल्लेख करतांना श्री. पांगारकर यांनीं पृष्ठ ५२० वर मुक्ताबाई-वटेश्वर चांगा-चक्रपाणि—असा उल्लेख करून चांगा वटेश्वरास चक्रपाणिचे गुरु म्हणून नमूद केलें आहे. म्हणजे एकदां चक्रपाणि म्हणजे चांगदेव व नंतर चक्रपाणि म्हणजे चांगदेवाचे शिष्य असे दोन्ही परस्पर विरुद्ध उल्लेख श्री. पांगारकरांनीं केले आहेत.

हा ग्रंथ लिहिणारा चांगदेव याबद्दलही बराच गोंधळ आहे. चांगदेव नांवाचे पांच चार पुरुष होऊन गेले. त्यांपैकीं या ग्रंथकाराचें नांव चांगावटेश्वर आहे. महाराष्ट्र सारस्वतकार भावे यांनीं म्हटल्याप्रमाणें "या चांगदेवाचीं चरित्रें अनेकांनीं गाइलीं आहेत; पण त्या सर्वांत इतका घोंटाळा आहे कीं आज त्यापासून फारसें निष्पन्न कांहींच होत नाहीं. फक्त एवढेंच म्हणण्यासारखें आहे कीं हा पुरुष प्रथम योगमार्गी असून पुढें भक्ति मार्गांत शिरला असावा. हा वयानें वृद्ध असून दीर्घायुषी असावा. हा प्रथम वटेश्वर या नांवाच्या गुरूचा शिष्य असावा व म्हणूनच यास चांगदेव वटेश्वर नांव पडलें असावें." परंतु तत्वसार ग्रंथाचा उपलब्ध भाग वाचून चांगदेवानें दोन गुरु केले असावेत असें वाटत नाहीं. एक गुरु सोडून दुसरा गुरु करणाऱ्यावर चांगदेवानें जे सणसणीत कोरडे ओढले आहेत (पहा ओं. ९३०-९५६) त्यांवरून स्वत: चांगदेवानें तसें केलें असेल असें म्हणवत नाहीं. गुरुत्याग व गुरुवध चांगदेवानें सारखेच मानले आहेत. निर्दैव माणसें स्वत: शुद्ध नसतात व मग गुरूवर गुरु करितात. एकलव्यासारखीं किंवा सावित्रीसारखीं माणसें स्वत:वरच विश्वास ठेवतात व स्वत:च्या विश्वासाच्या सामर्थ्यावरच तरून जातात. असे उद्गार काढणारा चांगदेव स्वत:च दोन गुरु

करणारा असेल असें संभवत नाहीं व असें म्हणावयास यत्किंचित् हरकत वाटत नाहीं कीं चांगदेवाचा गुरु एक वटेश्वरच. मग तो वटेश्वर कोणी असो !

आतां या वटेश्वराची तत्वसारांत काय माहिती सांपडते तें पाहूं. प्रारंभीचें गणेश शारदा वंदनानंतरचें गुरुवंदन सांपडलें असतें, तर या प्रश्नावर बराच प्रकाश पडला असता. पण तें जरी सांपडलें नाहीं तरी वटेश्वराचा उल्लेख बरेच ठिकाणीं आला आहे. चांगदेवानें निर्गुण भक्तीचा अनुवाद वटेश्वर प्रसादानें केला आहे. जें जाणल्यानें जाणीवेचा शेवट होतो तें वटेश्वराचें रूप वटेश्वर होऊनच चांगदेव सांगत आहे. त्रिगुण गोप्य गव्हर वटेश्वरस्वामीच्या प्रसादानें चांगदेवाचा संसार नाहींसा झाला व वटेश्वरानेंच आत्मब्रह्म दाऊन चांगदेवास चांगदेवाचें स्वरूप सांगितलें. गुरुशिष्य एक झाले, ही एक होण्याची 'भावना नाहींशी झाली व ती नाहींची भावना वटेश्वराचे ठिकाणीं राहिली. चांगदेवानें ही ग्रंथरूपी पूजा गुरुवटेश्वरास वाहिली. या प्रकारचें अवधूत चांगदेवानें किंवा वटेश्वराच्या सुतानें वर्णन केलें आहे. या सर्व उल्लेखावरून चांगदेवाचे ज्ञानमार्गांतील व योग-मार्गांतील गुरु वटेश्वर एकच आहेत असें वाटतें. वटेश्वर जर नुसते योगसिद्धच असते तर वरील ज्ञान त्यांचे कृपाप्रसादानें झालें, असें म्हणून वटेश्वराची मिथ्या स्तुति व ज्ञानगुरुविषयीं अकृतज्ञता चांगदेवानें केव्हांहि नसती दर्शविली शिवाय योगी वटेश्वराचा उल्लेख योगसिद्धांच्या नामावळींत न येणें आश्चर्यकारक नव्हे काय? त्या मालिकेंत मत्स्येंद्र चौरंगी, गोरक्ष व मुक्तादेवी एवढ्यांचा उल्लेख चांगदेव करितात यावरून वटेश्वर त्या मार्गांतील असतील असा संभव कमी वाटतो.

चांगदेवांचे अभंग पाहतांही वटेश्वर नांवाचा त्याचा योगमार्गी कोणी गुरु होता असें वाटत नाहीं. रा. गोंधळेकरांनी प्रसिद्ध केलेल्या ज्ञानदेवाच्या गाथेंत चांगदेवाचे म्हणून ४६ अभंग दिले आहेत. त्यांतही वटेश्वराचा योगाशीं कोठेंच संबंध लावलेला नाहीं. उलट जेथें जेथें वटेश्वराचा संबंध आहे तेथें तेथें तो ज्ञानाशींच आहे. उदाहरणार्थ अभंग ८ मध्यें चांगदेव म्हणतात. 'चांगा वटेश्वरी सोहं झाला। अवघाचि बुडाला ज्ञान डोहीं.' अभंग २० मध्यें 'डोळां लावुनि निजीं निजेला

निवांत। स्वप्नीं वटेश्वर देखिला निवांत.' जिवींचें हितगुजज्ञान कोणी सांगितलें तर चांगदेव वर्णन करितात 'चांगा म्हणे जिवींचें गुज, वटेश्वरें मज सांगितलें'. (अभंग ३४) शेवटीं शेवटीं अभंग ४५ मध्यें तर स्पष्टच उल्लेख आहे कीं 'चांगा सोय धरी ज्ञान–वटेश्वरीं। मुक्ताई जिव्हारीं बोध करी।' या सर्व अभंगांतून वटेश्वराचा योगमार्गाशीं कोठेंही संबंध चांगदेवानें सांगितलेला नाहीं. तेव्हां चांगदेवांच्या या प्रत्यक्ष उल्लेखाविरुद्ध नुसत्या दंतकथांवर उभारलेले वटेश्वराचे योगमार्ग–संबंध प्रमाणभूत मानतां येत नाहींत.

मग हा वटेश्वर होता तरी कोण? ज्ञानदेवांची भेट होईपर्यंत चांगदेव कोराच होता. अनेक सिद्धींनीं युक्त असून चांगदेवाचें कोरेंपण, ईश्वराशीं प्रत्यक्ष भेट होत असतांही नामदेवाच्या कच्चेपणासारखेंच होतें. हें कोरेंपण घालविण्यासाठीं ज्ञानराजांनीं चांगदेवास चांगदेव पांसष्टी लिहून पाठविली. पण तिचा अर्थ त्यास कळेना. तेव्हां श्री. मुक्ताबाईनीं चांगदेवास विश्रांति-वटाखालीं त्या चांगदेव पांसष्टीचा अर्थ सांगितला व चांगदेवास ईश्वरस्वरूप करून दिलें. या दंतकथेवरून वटाखालीं दाखविलेल्या स्वतःचे ईश्वरस्वरूपाशीं एकजीव झालेला चांगदेव तर पुढें वट +ईश्वर=वटेश्वर या नांवानें ओळखिला जात नसेल ना? म्हणजे मूळचा चांगदेव वटाखालीं ईश्वर झाल्यामुळें चांगावटेश्वर झाला असावा. वटेश्वर म्हणजे दुसरें कोणी नसून चांगदेवाच्या अंतर्यामी प्रकाशणारें ईश्वर स्वरूप. या कल्पनेस मान्यता दिली म्हणजे सारीं कोडीं उलगडतात. 'गुरूनुं शिष्याचा घोंटु भरूनु', 'तंव शिष्य मुखीं प्रवेशला', 'गुरु शिष्य एक झाले तें झालें पणहि गेले, गेलें पण राहिलें, वटेश्वरिं' इत्यादि तत्वसारांतील वाक्यांचा, बोध स्पष्ट होतो. अभंगांतलीं अनेक स्थळें उलगडतात. उदाहरणार्थ मागें उल्लेखिलेला चरण आतां अधिक स्पष्ट समजतो. 'चांगया सोय धरीं ज्ञान वटेश्वरीं' ही मुक्ताबाईची भाषा ज्ञानरूप वटेश्वर मानला तर अधिक समर्पक होईल. अभंग २२ मध्यें 'मुक्ताई म्हणे नांव पैं ठेवीन, सुता बोलवीन वटेश्वरा,' याचा अर्थ या कल्पनेनुरूप जास्त चांगला लागतो. शिवाय ४६ अभंगांपैकीं ५ अभंगांत चांगदेव हें नांव मुळींच नसून नुसतें वटेश्वर हेंच नांव आहे. तत्कालीन कवींच्या

आपल्या प्रत्येक अभंगांत आपल्या नांवाची छाप घालण्याच्या पद्धतीकडे लक्ष्य दिलें तर वटेश्वर हें स्वतःचें नांव नसतांना चांगदेवानें घातलें असेल असें संभवत नाहीं. चांगदेवासारख्या वयोवृद्ध व सिद्ध पुरुषाचे गुरु होण्यापेक्षां त्यास स्व-स्वरूपाचाच शिष्य करणें मुक्तादेवीस अधिक योग्य वाटलें असेल. वटेश्वराचें कोडें दुसऱ्या एखाद्या अधिक बळकट पुराव्यानें सुटेपावेतों वटेश्वर म्हणजे चांगदेवांचें शुद्ध आत्मस्वरूप असेंच मानिलें पाहिजे. हें स्वरूप समजल्यावर चांगदेव, चांगावटेश्वर, किंवा वटेश्वर या तीन्ही नांवानें एकच व्यक्ति ओळखिली जाण्यास हरकत नाहीं, या उपपत्तीमुळें योगसिद्धांचे मालिकेंत वटेश्वराचें नांव न येण्याचेंही कारण स्पष्ट समजतें.

आतां ग्रंथगर्भी काय सांगितलें आहे हें पाहूं. पहिल्या पांच ओंव्यांत गणेश-स्तवन असून पुढें १३ पावेतों शारदास्तवन आहे. यापुढें गुरुस्तवन असावेंसें वाटतें. यानंतरच्या ज्या ओंव्या सांपडल्या नाहींत त्यांत स्थूल व सूक्ष्म भक्तीचें ज्ञान वैराग्य–संमतीनें वर्णन केलेलें असावें असें ५९५व्या ओंवीवरून वाटतें. याप्रमाणें स्थूल व सूक्ष्म भक्ती सांगून चांगदेव निर्गुणभक्तीकडे वळले आहेत. या निर्गुणभक्तीचें विवरण करण्यापूर्वी चांगदेवानें पद, पिंड, रूप व रूपातीत या चार गोष्टींचा विचार केला आहे. पद म्हणजे श्वासोश्वासाबरोबर होणारे सोऽहं, अहंसः हे शब्द. पिंड म्हणजे शरीरास आधारभूत असलेली कुंडलिनी. रूप म्हणजे पंचमहाभूतांचा विस्तार व लय व या संकोच विकासाहून पर, द्वैता-द्वैतापलीकडील जो, तो रूपातीत. या रूपातीताची भक्ति तीच निर्गुणभक्ति. ६४१ ओंवीपर्यंत हाच विषय विस्तारानें प्रतिपादन केला आहे.

ओंवी ६४३ पासून ६६४ पावेतों हठयोग सांगितला आहे. पण यांत मुख्य सांगितलेली गोष्ट म्हणजे शरीर–साधना न करणें. गुरुपरंपरागत व स्वानुभूत वर्णन कसें असतें याचा वरील ओंव्या उत्तम मासला आहेत. समाधीच्या या ओंव्या व ज्ञानेश्वरीतील या विषयाच्या ओंव्या परस्पर ताडून पाहण्या सारख्या आहेत. समाधि लाऊन मन निर्विषय करणें व निर्गुणभक्ति करणें एकच आहे. येथें चांगदेवानें नुसती 'शब्दाची चावटी' केली नसून 'आधीं केलें मग सांगितलें' या न्यायानें स्वानुभवच शब्दरूपानें ओतला आहे. पुढें निर्वाण व सिद्ध योग

सांगून ब्रह्मविवरणास आरंभ केला आहे. मग प्रत्येक साकार वस्तु ब्रह्म कशी असते हें सांगून तिचा त्याग कसा करावा याचें विवरण ओंवी ७३० पर्यंत आहे. निरनिराळया क्रिया, निरनिराळे योग, निरनिराळीं शास्त्रें, एवढेंच नव्हे तर पितृगोत्र, जीवभाव यांच्याही ममतेचा त्याग केला पाहिजे. नुसत्या शरीरसिद्धीचीच नव्हे तर तिज बरोबरच पापपुण्य, वर्णभेद, निंदास्तुति, मानापमान, सुखदु:ख, आस्तिक नास्तिक वाद, रिद्धि सिद्धि, कर्म निष्कर्म इत्यादिकांची आस सोडतां सोडतां पंच भूतांचाहि त्याग झाला म्हणजे जें अप्रमेय, अक्षय, अविनाश, अच्युत, सदाशिव, सानंदपूर्ण, सर्वज्ञ, शांत, मंगल, वेदवेद्य, ॐकाराक्षर ब्रह्म राहतें तें तूंच आहेस' अशी तत्वमसि वाक्याची फोड केलेली आहे.

हा तत्वमसि उपदेश समजला व मनाचा पूर्णपणें लोप होऊन संकल्प विकल्प मावळले म्हणजे सर्व प्रकारच्या प्रवृत्ति आपोआप मावळतात. मग उचितानुचित कर्माचें बंधन रहात नाहीं. ब्रह्मवल्ल्युपनिषदांत सांगितल्याप्रमाणें 'एतँह वाव न तपति। किमहं साधु नाकरवम्। किमहं पापमकरवमिति'—मी कोणतें पाप केलें किंवा मी कोणतें सत्कृत्य केलें नाहीं इत्यादिकांचा ताप त्यामागें रहात नाहीं. मग त्याच्या हातून कुकर्म जरी झालें तरी त्याचें बंधन त्यास होत नाहीं. पण अकर्म करून बंधन होत नाहीं हा विषय स्पष्टपणें समजला नसेल म्हणून दोन उदाहरणें देऊन शंका घेतल्या आहेत व त्याचेंच समाधान मोठ्या मार्मिकपणें केलें आहे. संकल्प असो कीं नसो, कोणाचें ऋण काढिलें किंवा विधवा ब्राह्मणस्त्रीनें पुरुषसंग केला तर तें ऋण द्यावें लागेल कीं नाहीं किंवा त्या विधवेस गर्भ राहील कीं नाहीं या शंका, आणि मेल्यावर ऋण द्यावें लागत नाहीं किंवा क्षारादिक औषधींनी गर्भ धारणाच होत नाहीं हें समाधान, मूळांतच ओंवी ८०३ ते ८२७ पर्यंत वाचलें पाहिजे.

हें ज्ञान अत्यंत कठिण आहे, थोडा वेळ पटलें तरी पुनः पुन्हा अज्ञानाचें पटल मनावर येतच असतें, आणि म्हणूनच वर सांगितल्याप्रमाणें क्रिया कर्मांचा लोप करणारें ज्ञान भलत्यास सांगणें साहसाचें आहे. तो लोप आपोआप स्वाभाविकपणें झाला पाहिजे. मुद्दाम करून चालत नाहीं. हटानें केल्यास उपयोग नाहीं. या

साठींच वेदान्त ज्ञान 'अशिष्याय न देयं' असा प्रतिषेध आहे. चांगदेवानेंही या निषेधाचाच अनुवाद केला आहे. अज्ञान पटल मनावर न येऊं देणें फार कठिण आहे व या कार्यांत थोडें यश येऊन पूर्ण सिद्धि प्राप्त न झाली तर काय होईल या प्रश्नाचें उत्तर भगवद्गीतेस अनुसरूनच 'असा अपभ्रष्ट पुरुष चांगल्या कुळांत जन्मून विधियुक्त भक्ति आचरितो व सिद्ध होतो' असें ८४७ ओंवींत दिलें आहे. योग्याच्या सिद्धि भ्रंशाचें कारण मात्र चांगदेवानें भिन्न दिलें आहे. योगमार्गांत सिद्धि मिळूं लागली कीं आपलें स्थान जाईल ही देवांस भीति वाटूं लागते व म्हणून ते या योग्याच्या मार्गांत विघ्नें आणीत असतात अशी चांगदेवांची उपपत्ति आहे. पण ही विघ्नांची भीति सिद्धदशा आंगीं बाणण्यापूर्वीच आहे. सिद्ध झाल्यावर मग विघ्नें कोठलीं ?

यापुढें ओंवी ८६७ पासून योगमार्गांतील सिद्धांचीं नांवें दिलीं आहेत. आजपावेतों हठयोग प्रदीपिकाकार स्वात्माराम योगीश्वरानें सांगितलेली या मार्गांतील

**" श्री आदिनाथ मत्स्येंद्र शाबरानंद भैरवा ।**
**चौरंगी–मीन–गोरक्ष–विरूपाक्ष–बिलेशया: ॥**
**मंथानो भैरवो योगी शुद्धबुद्धश्च कंथडि: ।**
**कोरंटक: सुरानंद: सिद्धनाथश्च चर्पटि: ॥**
**कानेरी पूज्यपादश्च नित्यनाथो निरंजन: ।**
**कपाली बिंदुनाथश्च काकचण्डीश्वराह्वया: ॥**
**अल्लमप्रभुदेवश्च घोडा चोलीच टिंटिणि: ।**
**भालुकी नागदेवश्च खण्डकापालिकस्तथा ॥**

एवढ्याच लोकांचीं नांवें माहीत होतीं. पण चांगदेवानें याहूनहि विस्तृत नामावलि दिली आहे. ८८१ ओंवींत ही मालिका संपली नाहीं व पुढील ओंव्या उपलब्ध नसल्यानें ही यादी आणखी किती लांब होती हें सांगतां येत नाहीं. या यादीवरून चांगदेवाच्या काळीं हा पंथ किती पसरला होता व यांत सर्व जातींच्या स्त्री पुरुषांचा कसा समावेश होता एवढें मात्र ठळकपणें नजरेस पडतें.

पुढील उपलब्ध ओंव्यांत गुरुभक्तीचें माहात्म्य व गुरुद्रोहाचे दोष वर्णन केले आहेत. चांगदेवानें सांगितलेली गुरुसेवा सामान्य नसून पूर्णपणें स्वत्वास विसरणाऱ्या अनन्यपणाची आहे. गुरु दिसल्या बरोबर तर लोटांगण घातलेंच पाहिजे पण गुरु ज्या दिशेस असेल तिकडेही नमस्कार केला पाहिजे. गुरूचें वृथा अनुकरण तर करूंच नये पण गुरू ज्या आसनावर बसत असतील त्या वरही बसूं नये. उलट गुरूच्या घराची किंवा आसनाचीही चित्तशुद्धिसाठीं पूजा केली पाहिजे. गुरुत्याग किंवा गुरुद्रोहाच्या पातकास तर सीमाच नाहीं. एक गुरू सोडून दुसरा करणारास तर चांगदेवानें 'पुंश्चली' ची उपमा दिली आहे. जसें कन्या वरावयापूर्वींच कुळाचा विचार केला पाहिजे तसेंच येथेंही आहे. शिवाय चांगदेवाच्या मतानें गुरुपासून मिळणारी सिद्धि पुष्कळशी स्वत:वरच अवलंबून आहे. मातीच्या केलेल्या द्रोणाचार्यापासूनहि जर एक लव्यास सिद्धि मिळवितां आली तर मग असिद्ध कोण राहूं शकतो? गुरुद्रोह चुकून घडल्यास त्याचा निस्तार कसा करावा हा भाग पुन्हा गहाळ झाला आहे.

सरते शेवटीं संवादात्मक ग्रंथाच्या अंतीं असणारा 'पूर्णपणें समजलें ना?' असा प्रश्न असावासें वाटतें. श्रीमद्भगवद्गीतेंत 'कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय' असा प्रश्न विचारून 'स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव' असें उत्तर आहे. पण येथील उत्तर फारच बहारीचें आहे. येथें शिष्य गुरूसच असें उत्तर देतो कीं 'आतां समजावयाचें कोणी व काय? समजणारा, जें समजावयाचें तें व समजण्याची क्रिया ही त्रिपुटीच नाहींशी झाल्यावर मौनाशिवाय उत्तरच काय? गुरूनेंही पण शिष्य इतका तयार झाल्यावर आपणापेक्षां निराळा ठेवण्याचें कारण नाहीं असें समजून त्यास स्वस्वरूपीं मेळविलें. ही मिळणी चांगदेवानें फारच मौजेची वर्णिली आहे. गुरूनें आ पसरिला व शिष्यानें गुरूचे मुखांत प्रवेश केला व याप्रमाणें गुरु शिष्य एकस्वरूप झाले. तत्वसाराचा शेवट याहून चांगला कसा असूं शकणार? सद्गुरूनें जें आपलें निजस्वरूप शिष्यास समजाविलें, तें पूर्णपणें समजून शिष्य व गुरु हा द्वैतभाव सुटून दोघेहि एकच ब्रह्मस्वरूप झाले कीं सर्व तत्वांचें सार प्राप्तच झालें. हाच खरा तत्वसाराचा गर्भितार्थ.

ग्रंथाचें अंतर्याम पाहिल्यावर थोडेसें बहिरंगाकडेही लक्ष्य दिलें पाहिजे. ग्रंथाचा छंद ओंवी असल्याबद्दल स्वतः चांगदेवानेंच अंतिम ओंवींत सांगितलें आहे. हा मराठी भाषेंतील आद्य छंद होय. सोमेश्वराचा असा स्पष्ट उल्लेख आहे कीं 'महाराष्ट्रेषु योषिभिद्‌रोंवी गेया तु कण्डने' म्हणजे महाराष्ट्रांतील बायका कांडतांना ओंव्या गात असतात. अभंग हें नांव जरी जुन्या ग्रंथांत सांपडत नसलें तरी ओंवी हें नांव सर्रास सांपडतें. ओंवीबद्ध ग्रंथ लिहिणाऱ्या सर्वांनीं बहुतेक आपल्या ग्रंथाच्या शेवटीं या छंदाचें नांव घातलें आहे. ज्ञानेश्वरांनीं तर 'तैसी गाणीवेते मिरवी, गीतेवीण ही रंगु दावी, तो लोभाचा बंधु वोवी, केली मियां' असें कारण दाखवून ओंवी छंदाचा अंगीकार केला आहे.

ओंवी शब्दाची व्युत्पत्ति राजवाडे यांनीं आपल्या मराठी छंदावरील लेखांत पुढीलप्रमाणें दिली आहे. "ऊङ=सूत्र ओंवणें ह्या धातूपासून ओवी हा शब्द निघाला आहे. आ+ऊयन=ओयन=ओयनिका=ओवणिका=ओवइआ =ओवीआ, ओविया. अथवा वे (ओंवणें, ग्रंथ रचना करणें) या धातूपासून नाम ऊति. आ+ऊति=ओति=ओइ=वोवी=ओंवी. अशीहि सिद्धि होऊं शकेल. परंतु ओवणिका हा शब्द ज्या अर्थीं शके १५६०तील मुऱ्हारिमल्लबास नामें करून मानभाव ग्रंथकाराच्या दर्शनप्रकाश ग्रंथांत आला आहे, त्या अर्थीं पहिलीच व्युत्पत्ति ग्राह्य दिसते." पण या दोन्ही व्युत्पत्ति समाधानकारक वाटत नाहींत. कारण आ उपसर्गपूर्वक ऊङ धातु कोठें वापरलेला आढळत नाहीं. आ+वे धातु जरी उपयोगांत असला तरी ऊति या शब्दाबरोबर आ लागून ओति हा शब्द अप्रयुक्तच आहे. सबब ओंवी शब्दाची व्युत्पत्ति निराळ्याच प्रकारानें केली पाहिजे. शिवाय वरील व्युत्पत्तींत घेतलेल्या ओंवणें या अर्था-वरूनही ओंवीच्या प्राचीन प्रकाराची उपपत्ति लागत नाहीं.

ओंवी शब्दाची वर दिलेल्या दोन प्रकारांहून निराळी अशी सिद्धि करतां येण्यासारखी आहे. ती म्हणजे आ+वप् धातूपासून. आवप्=वांटा काढून ठेवणें. यज्ञांत प्रत्येक देवतेस अनुलक्षून जो हविर्भाग निराळा काढून द्यावयाचा असतो त्याचें नांव आवपन. आवपनी, आवपनिका हीं यज्ञांतील लहान पात्रांचीं

नांवें आहेत. मापांप्रमाणें या पात्रांनीं वांटे काढावयाचे असतात. आवपनी, आवपनिका यांचीं ओपणी, ओपणिका हीं रूपें सहज सिद्ध होतील व 'पोवः' या प्राकृत सूत्राप्रमाणें 'प' चा 'व' करून ओवणिका शब्द होणें सुलभ आहे. शिवाय भाग काढून ठेवण्याचे अर्थात आणखीहि एक अर्थ सुचविला जातो, जो या शब्दाच्या सिद्धिचें खरें स्वरूप सुचवितो. कांडतांना किंवा दळतांना कांहीं विवक्षित कालानंतर नवीन भरण उखळांत किंवा जात्यांत टाकावयाचें असतें. हा काल ठरविण्यास अशा गीतांचा उपयोग करीत असावेत. म्हणजे एक गीत झालें कीं एक ओपणी संपली व या अर्थानें ओपणी, ओपी त्या धान्याच्या मापास व तें माप कांडलें जात असतांना किंवा दळलें जात असतांना म्हटल्या जाणाऱ्या गीतास लावला गेला असावा. या व्युत्पत्तीप्रमाणें ओंवी या शब्दास विशेष अर्थ येतो व हा छंद निर्माण होण्याचें कारणही ध्यानीं येतें.

आरंभीं आरंभीं ओंवीचे चरण निश्चित अक्षर संख्येनें युक्त असतील, कारण त्याशिवाय कालमापन बरोबर करतां येणार नाहीं. पण संस्कृत अनुष्टुपाप्रमाणें मराठी ग्रंथकार जेव्हां ओंवीचा ज्योतिष, वेदांत, वैद्यक, इत्यादि शास्त्र ग्रंथ लिहितांनाहि उपयोग करूं लागले, तेव्हां हा अक्षर नियम शिथिल होऊन ओंवीस सयमक गद्याचें स्वरूप आलें. याच कारणाकरितां अनुष्टुप् छंदाला ज्याप्रमाणें 'एक नेम नसे गणीं' चें रूप राहिलें, तसेंच ओंवीचें रूप राहून शिवाय अक्षर संख्येचेंही बंधन राहिलें नाहीं. म्हणूनच ओंवीचें लक्षण बांधतांना भीष्माचार्यास "गायत्री छंदापासौनि धृतिपर्यंत, ग्रंथवोवियांचे तीन चरण जाणावे मिश्रित, प्रतिष्ठेपासौनि जगतीपर्यंत, चौथा चरण" असें सांगावें लागलें. ज्ञानेश्वरींतल्या ओंवी चरणाची संख्या मोजून पाहिल्यामुळें राजवाड्यांस असें लक्षण बांधावें लागलें कीं "ओंवीचे पहिले तीन चरण 'सुप्रतिष्ठा' पासून 'धृति' पर्यंतच्या कोणत्याही छंदाचे असतात आणि चौथा चरण 'मध्यमा' पासून 'जगती' "छंदापर्यंतच्या कोणत्याहि छंदाचा असतो." सारांश काय कीं भीष्माचार्यांनीं ओंवीच्या प्रथम तीन चरणांत कमींतकमी ६ अक्षरें तरी असावींत असा नियम केला व राजवाड्यांनी ही ६ अक्षरांची संख्या ५ वर आणली. चांगदेवाच्या

ओंव्यावरून ही संख्या आणखीही खालीं आणावी लागेल. तत्वसारांतील सर्वांत लहान ओंवी ६६६वी आहे. इच्यांत तीनच अक्षरांचा एक चरण पडतो. 'हें नोबलें, पाहिलें, तेंवीचि कैसें केलें, जाणनेण' ही ती ओंवी. यावरून आपणांस एवढेंच म्हणतां येईल कीं अर्थानुरोधानें प्रसंग पडेल तसे ओंवीचे चरण मराठी ग्रंथकार लहान मोठे करीत असत.

येथपर्यंत हा तत्वसार ग्रंथ कसा मिळाला, तो कोठें, केव्हां व कोणी लिहिला आणि त्याचें अंतरंग तथा बहिरंग कसें आहे, याचा विचार केला. आतां ज्यांचे कृपाप्रसादानें हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे त्यांचे आभार मानून हा बराच लांबलेला उपोद्घात पुरा करावयाचा आहे. सर्वांत प्रथम प्राच्य ग्रंथसंग्रहालयाचा उपक्रम करणारे ग्वाल्हेर सरकारच्या शिक्षा विभागाचे अधिकारी रा. ब. लक्ष्मण भास्कर मुळे यांचे व ग्वाल्हेर मुक्कामीं त्या कार्यास इतकें व्यवस्थित रूप आणून देणारे रा. केशव बळवंत डोंगरे यांचे आभार मानले पाहिजेत. रा. डोंगरे यांनीं ग्रंथ प्रकाशित करावयाचें ठरवून उपोद्घात व टीपा लिहिण्याचें काम मजवर सोंपविलें. दुसऱ्या एकाद्या लेखकाकडे हें काम दिलें गेलें असतें तर हें याहून पूर्वींच पुरें झालें असतें. पण माझे इतर व्यवसाय सांभाळून मला हें कार्य करावें लागल्यामुळें या प्रकाशनास कल्पनेबाहेर विलंब लागला याबद्दल खेद प्रदर्शित करणेंही माझें कर्तव्यच आहे. हा सारा विलंब सोसून अलीजाह दरबार प्रेसनें हें पुस्तक इतक्या चांगल्या रीतीनें छापून दिलें याबद्दल प्रेसचे व्यवस्थापक श्री. मानगांवकर यांचे आभार मानल्याशिवाय हें आभार प्रदर्शनाचें कार्य पुरेंच होणार नाहीं. सबब या सर्वांचे आभार मानून व ज्यांच्या कृपाछत्राखालीं हें सर्व सुव्यवस्थित होत आहे ते आमचे श्रीमंत महाराज जिवाजीराव साहेब शिंदे दीर्घायु होऊन अशा प्रकारचीं वाङ्मयात्मक कामें त्यांच्या राजवटींत अनेक होवोत अशी ईश्वराजवळ प्रार्थना करून हा उपोद्घात पुरा करितों.

लश्कर ग्वाल्हेर.
ता: १० मे १९३६.

ह. रा. दिवेकर.

॥ ॐ नमः कुंजरेश्वराय ॥

## गणेशवंदन.

म्यां नमिला गणेश्वरु, जो कल्मक्षवनकुठारु, सर्वशास्त्रविचारु, पूर्णदीप ॥ १ ॥

जो सौजन्याचा अंकुरु, शब्दब्रह्मविद्येचा उच्चारु, उन्मेषाचा तरुवरु, कल्पवृक्षु जो ॥ २ ॥

जो आनंदें डुल्लतु, प्रबोधें नाचतु, तांडव अभिनवितु, शंभुपुत्रु जो ॥ ३ ॥

जो विघ्नविध्वंसनु, अविद्यातृणदहनु, कुविद्याभरण हुताशनु, ज्ञानाग्नी जो ॥ ४ ॥

जो सगुणद्रुमु सहजु, गिरिजे शंभुचा आत्मजु, तो नमिला मूषकध्वजु, एकदंतु ॥ ५ ॥

## शारदावंदन.

वाचा प्रदक्षिणा करुनु, गणेशातें नमुनु, आतां साष्टांगिं प्रणमुनु, शारदेतें ॥ ६ ॥

जे शब्दब्रह्माची मूळिका, काश्मिरीची नायका, जे बुधींसि प्रेरका, वागेश्वरी ॥ ७ ॥

जे गोक्षीरधवळ, स्फटिक संकाश निर्मळ, विशुद्ध उभयकुळ, ब्रह्मपुत्री ॥ ८ ॥

जिये हंसाचें वाहन, पाशांकुशधरण, महिमान्नें गहन, सरस्वती ते ॥ ९ ॥

जिये नवरसांचा अळंकारु, सप्त स्वरांचा शृंघारु, नादाचा अवतारु, नादमूर्ति ॥ १० ॥

जिया नादाचिया प्रीती, ईश्वरु केला अती, तिं पावविला तृप्ती, नादें तेया ॥ ११ ॥

जय जय परमेश्वरी, लंबिके खेचरी, संतुष्ट वागेश्वरी, परम गुह्य ते ॥ १२ ॥

जे महिमानें गहन, स्वभावें प्रसन्न, भला रे म्हणौनि वचन, अनुवादली ॥ १३ ॥

## वंदन.

आतां ................ ............ ....

................ ................ ................

.... .... ..... ....... ........

.... . ...... ............... ........ .....

...वैराग्य तें ऐसें, जें देह अहंतेसि रुसे, इछा क्रिया राहे आपैसें, योगसिद्धि ॥ ५९० ॥

जरि अष्टांग योगाभ्यासु, तरि स्वभावें होय स्वयंप्रकाशु, देखिजे परमहंसु, परमात्मा ॥ ९१ ॥

शरीरसिद्धांत गोप्यगह्वर, तें केंवि करूं गोचर, परि सकळै निःशब्दाधार, कथन करीन ॥ ९२ ॥

जैसा गुरुद्रोहु न पडे, आणि सिद्धिद्वेषु न घडे, तैसा बोलों उजेडें, शरीरनाथु ॥ ९३ ॥

सोपानें बोलिजैल, शास्त्राज्ञा कथिजैल, अध्यात्मि किजैल, रूप चांग ॥ ९४ ॥

हे स्थूल सूक्ष्म भक्ति. बोलिलि ज्ञान वैराग्यसंमति । ते परियसा निर्गुणभक्ति, चांगा म्हणे ॥ ९५ ॥

## निर्गुणभक्ति.

जे वातिवरि गिवसिता, न दिसे संसारवार्ता, ते हि निर्गुण भक्ति सेवितां, प्रपंचु तुटे ॥ ९६ ॥

जे पापापुण्यापूर्वि, जन्म मरणातें हारवि, महा बोधु चेववि, आत्मस्वरूपें ॥ ९७ ॥

जे दुसरेपणा हाणि, स्वर्गसंसारा धुणि, जे सेवितां निर्वाणिं, स्वयं शिव ॥ ९८ ॥

हे निर्गुण भक्ति, आइकिजें स्वात्महीति, आहो इये परौति, वस्तु असेचिना ॥ ९९ ॥

आतां वटेश्वराप्रसादें, मीं निर्गुणभक्ति अनुवादें, तरि आइकतु श्रोते विनोदें, चांगा म्हणे ॥ ६०० ॥

तरि सांगैन परमशरिराचि स्थिति, ते परिसा निर्गुण भक्ति, जिया कैवल्य प्राप्ति, मोक्षरूप ॥ १ ॥

## तिचे विभाग.

ते निर्गुण भक्ति द्विधा, रूप रूपातित पदा, गुरुप्रसादें सानंद, रहस्य कथीन ॥ २ ॥

पदा पिंडाची स्थिति, रूपरूपातीतप्राप्ति, सबीज भेद वितिपत्ति, प्रथक् सांघैन ॥ ३ ॥

पिंडु म्हणिजे कुंडालिणि शक्ति, पद परमहंसु म्हणीपति, रूप बिंदु कळा ज्योति, एर कळामय ॥ ४ ॥

## पद.

आतां पदाचा विचारु, सांधिजैल नागरु, अवधानें देयावें जि अवसरा, एकाचित्तपणें ॥ ५ ॥

तरि पद तैं परमात्मा म्हणिजे, ते वोंकार स्थान बोलिजे, जेथें वाचा उपजे, चतुर्विध ॥ ६ ॥

अव्यक्तु उपजे प्राणु, तस्य नादें मनु, मनव्योमा पासोनु, बुद्धि झाली ॥ ७ ॥

मनबुद्धिचा गव्हरी, तेथें जालिया वाचा च्यारि, परा पश्यंति मध्यमा वैखरि, बोलिजति ज्या ॥ ८ ॥

परा म्हणिजे ते मात्रावृता, तोचि घोषु परमात्मेया साक्षभूता, हे अनुभव संकेत, जाणिजे जी ॥ ९ ॥

तिये पासौनि पश्यंति, तेचि ध्वनि म्हणिपति, मध्यमा तिये परौति, ते नादस्वरूप जी ॥ १० ॥

तिये पासौनि वैखरि, एवं वाचा जालिया च्यान्ही, ते प्रणवादिक गव्हरी, स्थूल बीज ॥ ११ ॥

तेचि अक्षर द्विधा, हकार सकार भेदा, शिव शक्ति संबोधा, हंसवाक्य पैं ॥ १२ ॥

सकारु विसर्ग संयुक्तु, हकारु बिंदनादभरितु, हें बीजद्वय म्हणीपत, शिउ शक्ति ऐसें ॥ १३ ॥

शक्ति रहस्य सकारु, सबीज शिउ हकारु, हें दोन्ही आणि ॐकारु, अजपा म्हणिजे ॥ १४ ॥

आतां प्रवेशीं सकारु, बाह्य नीर्गमि हकारु, तेंचि सृष्टि संहारु, पृथग्बीजें ॥ १५ ॥

अवरोहिं विरोहिं म्हणिपति, चंचळें निश्चळें दिसाति, संततें वतति, मन व्योमिं ॥ १६ ॥

हें गुरुमुखें पाविजे, छंद ऋषि देवत जाणिजे, या परि किजे, मंत्र सिद्धु ॥ १७ ॥

एवं पद बोलिलें, तें संकेतें कथिलें, तव शिष्ये पुसिलें, पिंडु कैसा ॥ १८ ॥

## पिंड.

आतां पिंडव्याख्यान करीन, संकेतें सांघैन, उन्मेषें बोलैन, बालबोधें ॥ १९ ॥

पिंडु म्हणिपे शक्ति, कुंडलिणि विख्याति, देह गोळकोत्पत्ति, जेथौनियां ॥ २०॥

जे भुजंगळणे सूतले, आधारिं निक्षेपिलि, योगियां जालि, मुक्तिवरदा ॥ २१ ॥

जैसि विद्यु तेजें झळकति, कां जळिं मच्छक तळपति, तैसि आधारि मिरवति, तेजःपुंज ॥ २२ ॥

जे रविसंख्या सहस्रु, महा तेज प्रकाशु, तेवि स्वयं तेज बहुवसु, आधारिणी ॥ २३ ॥

जे कुळा अकुळा विचारु, पक्ष द्वय निर्धारु, षट् चक्रां आधारु, नाडित्रया ॥ २४ ॥

दशवायु गुणत्रया, रवि शशि बीज द्वया, पंचभूतिक पीठत्रया, शरीर संख्या ॥ २५ ॥

हे सर्व कुंडलिनिचि सृष्टि, उत्पत्ति संहार स्थिति, आतां गुरु विचारें बोलति, रूप कैसें ॥ २६ ॥

## रूप.

आतां रूप सांघैन आइका, जे दशविध परि एकि अनेका, पद पिंड विभागका, परि एकीचि जे ॥ २७ ॥

ते नाद बिंदु कळा ज्योति, एवंविध रूपाचि स्थिति, तियेते जांउ म्हणिपति, गुणात्मकु पैं ॥ २८ ॥

मन बुद्धि चित्त अहंकारु, हा चतुष्टय आकारु, पंचभूतिकिं अनेक विचारु, तोचि जाला ॥ २९ ॥

आतां पंचभूतिकोत्पत्ति, यांचि सांघैन वित्पत्ति, एक एका प्रति, जन्मजाले ॥ ३० ॥

शून्य ब्रह्मा पासौनि, आकाश जन्मले तेथौनि, सर्वां शेषा येउनि, व्यापुनि असे पैं ॥ ३१ ॥

तिये व्योमिं जन्मला पवनु, तेज तया पासूनु, येकमेकांते प्रसउनु, भूतसृष्टि ॥ ३२ ॥

आप तेजिं जन्मले, पृथ्वि तत्व आपि जालें, क्षिति प्ररोहो पातलें । सर्व बीज ॥ ३३ ॥

ऐसें नाही पासून जालें, ब्रह्म कोतिं विस्तारलें, ईश्वर तेज विकरलें, मूलमंत्र ॥ ३४ ॥

ईशान म्हणिजे आकाश, वायु म्हणिजे तत्पुरुष, अघोर तेज प्रकाशु, वामदेव म्हणिजे ॥ ३५ ॥

पृथ्वि सद्योजाता पासौनि, ऐसें पंच ब्रह्मीं होउनि, येणेचि अनुक्रमें गगनिं, विळ्यो पावे ॥ ३६ ॥

हे नादबिंदव्याप, यांते म्हणीजे रूप, आतां सांघेन संक्षेप, रूपातीत ॥ ३७ ॥

## रूपातीत.

पृथ्वी आपिं विरमे, आप तेजिं उपरमे, तेज पवनिं चि समे, वायु निराळंबिं ॥ ३८ ॥

जैसी दीपकळिका गगानिं, जाए तेथ हारपौनि,
तेंवि भूतें भूत गिळूनि, शून्य ठाके ॥ ३९ ॥

ऐसा संकोच विकाशु, या वेगळा प्रकाशु,
द्वैताद्वैत आभासु, रूपातीतु पैं ॥ ४० ॥

एवं पद पिंड जालें, रूप रूपातीत बोलिलें,
संकळौनि कथिले, भक्तियोग ॥ ४१ ॥

ऐसी भक्ति हे प्रधान, एवं गुरुभक्तीचें लक्षण,
आतां तूज सांघैन निर्वाण, शिष्यराया ॥ ४२ ॥

## हठयोग.

आतां साधारण सांघिजैल, हठयोगु बोलिजैल,
राजयोगु दाविजैल, तत्वसारें ॥ ४३ ॥

जरि हठयोगाची साधना, तरि न वचती देहाभिमान,
तेंचि तें अज्ञान, निरसेचिना ॥ ४४ ॥

देहाचें स्थान मान देखौनि, उदास होआवें जाणौनि,
अहंभावापासौनि, तरिचि सुटिजे ॥ ४५ ॥

जरि शरीर साधना लागला, तरि अखंड पद चुकला,
वृथा अभिमानिं पडला, जन्ममूळिं ॥ ४६ ॥

जन्हिं शरीरसाधना कीजैल, परि देह नाशिवंत जाईल, वरि जन्मांतें सुचिल, दुःखमूळ ॥ ४७ ॥

हें चौरंगी गोरक्षा साजे, आणि तैसिं तियें युग म्हणिजे, येथ आपणपें नेणिजे, काय होइल ॥ ४८ ॥

आणि ते देवांचे अंश, क्रेत द्वापर बहुवस, हें कलियुग सक्लेश, कर्म शरीरें ॥ ४९ ॥

आपण आत्मतत्व जाणिजे, मोक्षु येकु पाविजे, येथ विषइं न लविजे, विलंबु पैं ॥

वीर देह साभिमानु सांडौनि, शुन्य ध्याने विरमौनि, तरि युगसख्या वांचौनि, तोचि उरे ॥ ५१ ॥

देख पां चौरंगीनाथिं, कवण कर्म केलें देहांतिं, निर्गुण प्रवेशपथिं, सिद्धु झाला ॥ ५२ ॥

जरि सर्व अशेष साधलें, तरि कार्यकारणिं लागलें, स्वभावें देह उभारलें, कल्प कोटी ॥ ५३ ॥

म्हणौनि शरीर जाणावें, परि अभिमाना न यावें, मनोमळ तोडावे, शून्यघसणीं ॥ ५४ ॥

पवनाभ्यासु करूनि, बंधु भेद मुद्रा लंघौनि, येणे जाणे सांडौनि, ब्रह्मचि होइजे ॥ ५५ ॥

प्रथम वज्रासनी स्थीरुभूता, मूळद्वारें बंधु निरुता, निगतु पवनु मागुता, भरीतु कीजे ॥ ५६ ॥

अधें अडिजें, ऊर्धें बंधु दीजे, मध्य अंकुविजे, उच्छाल शक्ती ॥ ५६ ॥

गुरुवचनवर्मभेदें, शक्ति सूतली प्रबोधे, अधो मुख ऊर्धें, कमळ होए ॥ ५८ ॥

पवनघायें हाली, शक्ति पुष्टि उकलली, ऊर्ध पंथें निघाली, ब्रह्मरंध्रा ॥ ५९ ॥

पवन भारें चालती, ऊर्ध्वकर्मे पेलती, आर्त्तिस म्हणौनि ग्रासिती, व्याधि रोगातें ॥ ६० ॥

पवनप्रबोधें मातली, जीव भावा मुंकली, तवं सत्रावि श्रवली, शक्ति मुखिं ॥ ६१ ॥

मन पवन संधानें, शक्ति उसळली गगनें, भेदलीं स्थानें, षट्चक्रांची ॥ ६२ ॥

ग्रंथित्रय छेदुनि, षट्चक्रें भेदुनि, त्रिकुटिं योगु संपौनि, निर्गुणोसिं ॥ ६३ ॥

जें जाणतां जाणणें सरे, जेणें मनांचें मनत्व मुरे, तें सांधैन विचारें, चांगा म्हणे ॥ ६४ ॥

## निर्वाण.

आतां वटेश्वरु होउनु निगुतें, सांघैन मिं वटेश्वरातें, मना करावें गिळवीन मागुतें, संसारासि ॥ ६५ ॥

हें नोबले, पाहिलें, तेंविंचि कैसें केलें, जाण नेण ॥ ६६ ॥

जें सोनें घडौनि, अळंकारिं होइजे आनानी, तैसें आत्मा वांचौनि, बोलों नेणें ॥ ६७ ॥

आतां असो हें किति, उठउं संसाराची पांति, ये्हविं संसार विस्मृति, आपुला नव्हे ॥ ६८ ॥

जैसें निद्रेच्येनि प्रसादें, भोगीजती स्वप्नींची प्रमादें, तेविं अज्ञानाचेनि मदें, संसारु हा ॥ ६९ ॥

ये्हावीं आला प्रबोध दृष्टी, कैं मन कें श्रृष्टि, हे मनोमय उठी, मना पासौनि ॥ ७० ॥

आतां मनाचें कसण मोडिजैल, मन हा दोषु फेडिजैल, म्हाटिया बोलिजैल, सिद्धयोगु ॥ ७१ ॥

## सिद्धयोग.

मन जिये ठायिं लाविजैल, तो तोचि बंधु पडैल, म्हणौनि निराशी किजैल, तेणेंसिंचि ॥ ७२ ॥

जेथ जेथ मन लागैल, तो तोचि संसारु होइल,
म्हणौनि पांगुळ किजैल, निराळंबिं ॥ ७३ ॥

निराकार प्रकाशैल, तेथ साकार उछेदैल,
निर्गुण भाक्ति उपदेसील, गुरु शिष्यासि ॥ ७४ ॥

ज्या भक्ती निरुतें, पातले हृषींकेशातें, ते न
येतींचि मागुते, गर्भवासा ॥ ७५ ॥

ते शक्ति शून्य प्रभा, नाभिं फांकली व्योमगर्भा,
मनोमथ सगर्भा, नाशु होए ॥ ७६ ॥

त्रिगुण गोप्य गव्हरु, तो स्वामि माझा वेटेश्वरु,
तस्य प्रसादें संसारु, उन्मळीला ॥ ७७ ॥

जेणें आत्म ब्रह्म दाविलें, माझें मज उपासिलें,
असत संसारीक नाहिं जालें, चांगा म्हणे ॥ ७८ ॥

## साकार ब्रह्म

आतां येथूनु तत्वसार, सांघिजैल ब्रह्म साकार,
गुरु संवादें विचार, शिष्यासि पैं ॥ ७९ ॥

जें जें दावीतु जाईल, तें तें शिष्यु त्यजील,
बंधु पडों नेंदिल, कल्पनेचा ॥ ८० ॥

जैसी करिं जोति घेउनि. गृहवस्तु अवलोकुनि, स्वयं ठेविलें देखौनि, त्यागु कीजै ॥ ८१ ॥

नां तरि ऐली थडीये नावेचा, किजे प्रयत्नु स्विकारु तियेचा, पैलु पारु पावलेयां तिचा, पांगु फिटे ॥ ८२ ॥

तैसें देहस्थें देहातीत देखिलें, गुरु प्रसादें जाणीतलें, म्हणौनि त्यजी पुत्रा म्हणीतलें, अशेष हीं ॥ ८३ ॥

त्याजिं क्रिया कर्म जंजाळ, आणि भ्रांति माया पटळ, स्वप्नावस्था प्रबळ, जाणैं पुत्रा ॥ ८४ ॥

जैसी कव्हणी येकि काळ वषां पतित, भुजंगाकारें दोरी दीसत, तें लटिकें जालेयां मनत्व, स्वस्थानां आलें ॥८५॥

तैसा अज्ञानकाळु संसारु, आभासु मायामय साकारु, तत्वविचारें असंसारु, तोचि होए ॥ ८६ ॥

नांतरि स्वाप्निं संपत्ति लाहिजे, विह्वावो राज्य पाविजे, चेइलेयां असिजे, आपणपेंचि ॥ ८७ ॥

तैसीं अज्ञान विस्मृति निद्रा, दृश्यादृश्य स्वप्नभेद, स्वरूपिं चेइलेयां अभेद, स्वयं तोचि ॥ ८८ ॥

तैवि आभास मायामय सकळ, जैसं पाहातां मृग जळ, म्हणोनि त्याजि पुत्रा पाल्हाळ, द्वैत बुद्धि हे ॥ ८९ ॥

## त्याग.

त्यजिं आधार स्वाधिष्ठान, मणिपुर अनुहात ज्ञान, विशुद्धाज्ञा साधन, षट्चक्रांचें ॥ ९० ॥

त्यजिं मूळबंधु वायु साधन, खंडज्ञान लंबिकाकरण, अनहात श्रवण, नको भावुं ॥ ९१ ॥

त्यजिं अधोर्ध्व मध्यस्थान, आसन मुद्रा लक्ष ध्यान, अजपामंत्र साधन, अवस्था त्रय ॥ ९२ ॥

त्यजिं वादु दंडि दारुण, त्रिज्ञान विद्या सर्वज्ञपण, कळा कौशाळ पांडित्यपण, सांडौनि घाली ॥ ९३ ॥

त्यजिं धातु धातुर्वादु, रस रसायण उपाधि, विवर मुख्य करुनि समस्त विषयबुद्धि, झणें सेविं ॥ ९४ ॥

त्यजी तिर्थदेशभ्रमण, गिरि गव्हर कर्दळीवन, निरोपद्रव स्थानीं रहण, प्रारंभी तुं ॥ ९५ ॥

त्याजिं पितृगोत्र समस्त, जीव भाव सांडोनि होये निभ्रांत, देहसिद्धि न लगे सर्वथा, नाशिवंत हें ॥९६॥

ऐसें ही देह साध्य कीजेल, तरि आरिख एक बोलिजैल, ब्रह्मादिकीं देह त्याजिजैल, गणना अंतीं ॥९७॥

रजीं

शून्य,

ऐसे

तें स्वरूप

जैसी

उरे तें प्र

भरि

आपणपों

जैसि

तैसा शून्

मनिं

पावलें,

चि

नेति ब

जें

तुंचि

ां विरमति, ब्रह्मरूपीं इंद्र हारपति,
ळ्या जाति, आपुलीया यता ॥९८॥

ग्खस्ते, रुद्र शिवि मागुते, शिव
बुद्ध ॥ ९९ ॥

ःथति, तयें काए राहाति, म्हणौनु
ांडि बापा ॥ ७०० ॥

सांडिजाणें, ऐसें अभेद अंतःष्करणें,
, महाबोधें ॥ १ ॥

य कुळकथा, होए पद पिंडिं मुक्ता,
तां, निःसंशय ॥ २॥

ादु, शुचि शंका बंधु, विश्वरूपिं
ते ॥ ३ ॥

स्तुतें कडवसा, मानाभिमानु काइसा,
ा, होइ पुत्रा ॥ ४ ॥

नास्तिक वादु, भ्रमु वोषधींचा बंधु,
प्रबंधु, ज्ञान भ्रंशु ॥ ५ ॥

सिद्धिचि आवडि, स्वर्ग भोगादि फळें
त्वापासुनि बापुडि, हीणें देखों ॥ ६ ॥

त्यजिं कर्म निष्कर्म भावना, व्याप्य व्यापक कल्पना, भेदबुद्धि विवंचना, करिसि झणें ॥ ७ ॥

त्यजिं पृथ्वि मागौति, आपें आप तेथिं, तेजिं तेज निरुति, निरोपिं पा ॥ ८ ॥

## आत्मरूप.

पवनीं पवनु त्यजिं, आकाशीं आकाश यजिं, शेषिं उरेल त्या भजिं, आत्मरूपा ॥ ९ ॥

त्यजिं बुद्धि चित्त अहंकारु, आणि शून्य मानी विकारु, तेथ उरैल तो विचारु, लाभू विशेषिं ॥१०॥

कदालिस्तंभू उकलिता, शून्यगर्भु फळितां, तेणें आकारें वर्ततां, कैवल्य तुं ॥ ११ ॥

कदलिगर्भु दिसे, तैसें रूप तुझें असे, स्वयं गुरु तुसें, तरिचि जाणिजे ॥ १२ ॥

नातरि तया मना संहारु, वेदविधेचा विचारु, तोंचि तत्वसार साचारु, जाण पुत्रा ॥ १३ ॥

मन पवन शून्नीं हारपति, तल्लीन मन तोचि गति, तया परौतें कांहिं आथि, तुं वांचौनि ॥ १४ ॥

रजीं वेवस्ते तमः, रज सत्विं अभिन्न, सत्व शून्नीं शून्य, विलयो पावे ॥ १५ ॥

ऐसे गुणीं गुण विरमले मग स्वयं शून्य उरलें, तें स्वरूप आपुलें, फुडें जाणा ॥ १६ ॥

जैसी कर्पूरदीपांि, राणिवी लोपावे ज्योति, शेषि उरे तें प्रति, स्वयं जाण ॥ १७ ॥

भरितें घट्ट भरितु, माहा शून्य पुरीतु, तद्भावें बिंबतु, आपणपेंचि ॥ १८ ॥

जैसि उदकामध्यें घागरि, तरत सबाह्यभ्यंतरी, तैसा शून्य निरंतरीं, सुखें असे ॥ १९ ॥

मनिं मन विरालें, महा शून्य उरलें, तत्वसार पावलें, तेंचि तु जाण ॥ २० ॥

चित्त चेतना मुराली, निराळंभ झाली, श्रुति नेति नेति बोलिली, रहस्य हें ॥ २१॥

## श्रुतिरहस्य.

जें अप्रमेय अपार, सर्वज्ञचि सार, सर्वभूतिं अंतर, तुंचि असमी ॥ २२ ॥

जें अक्षय अविनाश, सारासार सर्वस्व, ब्रह्मादिकां उपास्य, कैवल्य जें ॥ २३ ॥

जें अच्युत अनुगत, सदाशिव साक्षात, सानंद मूर्ति, अनामय ॥ २४ ॥

जें गुणांत शेष, घनाघन एक, अनुपम्य सुख, सागर जें ॥ २५ ॥

जें निरंतर उदीत, बहुतांसि बहुत, सर्वज्ञ शांत, मंगळ जें ॥ २६ ॥

जें त्रिपदा गायत्री सार, ॐकाराक्षर, वेद वेद्य गह्वर, पावन जें ॥ २७ ॥

जेथ सृष्टि होए जाए, महासुख विसंवलें राहे, ते तुं प्रत्यक्ष पाहे, परीस पुत्रा ॥ २८ ॥

हें अचळ मूळ तुंचि, जें आदि अंतिं येकाचि, द्वैताद्वैत आपणाचि, येथ भेदु नाहिं ॥ २९ ॥

जैसें भांगार आदि अंतिं, तेंचि मध्यें भाव भजति, परि वस्तु विचारेंचिं तिं, तैसेंचि हें तुं ॥ ३० ॥

कांहिं चित्तिं नस्मर, तुंचि असमि निरंतर, तुंचि ये तुझे उपचार, अर्पलेंचि असे ॥ ३१ ॥

## मनोलय.

तुवां तुंचि मनिलें, तरि तुंचि अवघें झालें, मनाचें गेलें, मनपण गा ॥ ३२ ॥

पाहे पां विचारिं, तुंचि असती निरंतरिं, मनांचा गह्वरिं, रिगौनियां ॥ ३३ ॥

मनां माजि रिघ पां, तें रिघालेंपण नव्हे पां, नव्हलेंपण सांडि पां, सांडित्यें नसिं ॥ ३४ ॥

तेथ आणीक काय उरैल, आपणपांचि आपण असैल, जेथ शब्दु हा खुंटैल, आपें आपु ॥ ३५ ॥

जें बोलतां न बोलवें, मनांसि न कळवे, तें होउनि अघवें, असताचि असे ॥ ३६ ॥

पाहे पां तुंचि नाहीं, तेथ पाविजैल तें काइ, मग ध्यानां कवणिं ठाइ, सामावणी ॥ ३७ ॥

आधीं मनें उरावें, मग ध्यानातें धरावें, आता असो हें आघवें, आणपांचि ॥ ३८ ॥

अगा हें अघवेंचि उकललें, कांहिंचि नाहीं गुंतलें, मज प्रतीति आलें, म्हणौनि बोलिलां ॥ ३९ ॥

पाहें पां तुंचि विचारिं, हें मन नाहीं ऐसें करिं, तरि तुजावांचौ निरंतरिं, परिपूर्ण तुं ॥ ४० ॥

जेविं उदकिं उदकबिंदु उठिती, विराल्येयां उदकचि होति, तेविं आत्मस्वरूपिं होति जाती, भौतिकीयें ॥४१॥

तैसें चैतन्यें विकरलें, उंच नीच जालें, मध्यें पदर पडत गेले, कल्पनेचे ॥ ४२ ॥

ते कल्पना तुझी वितुळली, चित्तवृत्ति नाशली, भेदबुद्धी तुडाली, स्वरूपिंचि ॥ ४३ ॥

तें स्वरूपचि आपण, हें फुडें तुं जाण, वेदांत गुह्य प्रमाण, परिस पुत्रा ॥ ४४ ॥

आधिं रितें होआवे, मग धांऊनि भरावें, भरीताचि असे स्वभावें, तरि भरावें काए ॥ ४५ ॥

## स्वात्मविचार.

आपण आपणपेयां वोळगिजे, आपण आपणपेयां न्हवण पूजा कीजे, आपण आपणेयां प्रसन्न होइजे, तेथ मागतें कवण ॥ ४५ ॥

आपण आपणेयां ध्याइजे, सेव्य सेवकां होइजे, पत्र पुष्प वाइजे, आपणपेयां ॥ ४७ ॥

मुंगियेचां ठाउनु ब्रह्मवरि, समराभरीत बाह्यांतरिं, हें आपणपें विचारिं, तुं शिष्य राजा ॥ ४८ ॥

येथ मिं आणि तुंचि नाहीं, तेथ हा प्रपंच रिगेल काइ, आपण आपणेयां पाहिं, तुंचि अससी ॥ ४९ ॥

प्रकृति पुरुषां परौतें, जें नीच जंतुमात्रा खालौतें, हें आपणपेंचि निरुतें, तु फुडें जाण ॥ ५० ॥

जो मध्य ना सेवटु, भरितु ना वोहटु, जें अवघें तुंचि निघोटू, तत्वसार पैं ॥ ५१ ॥

आतां हठमात्रा नलग, प्रवृत्तिकर्मा उमग, स्वात्मसिद्धि लाग, जेथें मी दिसे ॥ ५२ ॥

कांहिं प्रवृत्ति निवृत्ति मानसिं, तरि आपणपेयांनि मळ तुजसि, आणि मिं चुकासि, तरि गिवसिसि कोठें ॥५३॥

मनें साध्यु म्हणिजे, तरि साध्यासि दुराविजे, नाहि तरि मनाहिं ऐसें किजे, तरि साध्य सिद्धे ॥ ५४ ॥

कापुसु उगउं जाइजे, नातरि उगवलें असे, तें सहजें, आपल्यानि ॥ ५५ ॥

पाहे पां पश्चिम दिशे जातां, आणि पूर्व दिशे चालतां, तो पावे दूरवार्ता, पदापदा ॥ ५६ ॥

ऐसें कांहिं प्रवृत्ति करौनि पावों म्हणिजे, तरि न पवौनि सिणीजे, नातरि निवृत्ति होइजे, तरि होणें तेंचि तुं ॥ ५७ ॥

मन सरौनि मावलें, तेथ उरे तेंहि निमालें, तरि माहा-शून्य उघडलें, तेंचि तुं पैं ॥ ५८ ॥

जें न मंघतां सांधणें, न पाहातां देखणें, न बोलतां बोलणें, शुद्ध बुद्ध ॥ ५९ ॥

जें सकलगुण निधिवंत, सर्व प्रपंचातित, द्वैताद्वैत व्यक्तिरिक्त, साक्षिभूत जें ॥ ६० ॥

जिवाचें जिव्हार, परमात्मा माहेर, आणि गुढांसि गुढांतर, चैतन्य तें ॥ ६१ ॥

जेथें शब्दशास्त्र हारपे, पुण्यपापें न सिंपे, नेति नेति म्हणौनि वासिपे, वेदश्रुति ॥ ६२ ॥

जेयासि सुशब्दाचा कळंकु, अनुवादाचा द्वेषु, अद्वैतेंसि रोषु, स्वयं गुह्य ॥ ६३ ॥

जेथ जीव परमात्मेयांचि मांगारें हारपति, वेदांति विचाराचे पाए न व्हाति, अद्वैताचिया अहंमति, न लिंपेचि जे ॥ ६४ ॥

जे स्वमेव एकचि, तयासि तोंचि, आपणयां आपणचि, होउनि असे ॥ ६५ ॥

जें अतीतासि अतीत सर्वां सर्व भरीत, तें हें तुंचि अखंडित, जाण पुत्रा ॥ ६६ ॥

आतां बहुत काइ बोलावें, अवघें तुंचि जाणावें, एवं गुणी आपुलें बरवें, रूप जाण ॥ ६७ ॥

ऐसें वैराग्य उपजलें, तुज तुंचि प्रकाशलें, तरि संसार हारपलें, स्वरूपिंचि ॥ ६८ ॥

एवं उपजले ज्ञान, तें तुंचि तुं आपण, तरि सृष्टि गति गहन, पातलासि ॥ ६९ ॥

ऐसा आत्मबोधें बोधला, सुखशयनीं सूतला, असे गगनी निमाला, आपुलांचि ॥ ७० ॥

अवकाशू शून्यातीतु, स्वयं शून्नी रतु, मन शेषि तृप्तु, होउनियां ॥ ७१ ॥

## कर्मलीला.

सहज शून्य भरितु, असैं पुत्रा संततु, भुवनत्रयीं विचरतु, स्वयं लीला ॥ ७२ ॥

अनाश्रय वर्ततु, निर्गुणातीत मत्तु, अनुचित्तें कर्म कारि तु, न बंधिजासि ॥ ७३ ॥

परि तेंचि अनुचित्त कर्म ऐसें, जें साक्षात परमानंद-वशें, नेणौनि पाविजे आपैसें, जाणौनियां ॥ ७४ ॥

जव ऐसें बोलिलें, तव शिष्याचें ध्वनित जाणितलें, उचितानुचित उरलें, कैरयेनि किजे ॥ ७५ ॥

तैसा केवळ शुद्ध बुद्धु, जेथें मावळला लोकत्रय संमधु, तरि अनुचित्त कर्म निषेधु, एथें कैचा ॥ ७६ ॥

ऐसें शिष्येंचि, जाणितलें मनिंचे, तरि संतोषौनि गुरुचें, हेचि वाक्य ॥ ७७ ॥

एन्हावि भोगु कां भोक्ता, कर्म कां कर्ता, हें नाहिं चि तत्वता, ज्ञानियांसि ॥ ७८ ॥

जरि रात्रि दिवसाचिये घरोपरि, असति काय सूर्याचां घरिं, तरी शुभाशुभें दुसरि, होति तेयां ॥ ७९ ॥

येणें जाणें ऐसें, नेणतेयाप्रति दिसे, जरि कांहीं जाणतेया ऐसें, जाणीतले ॥ ८० ॥

जरि जाणीतले, तरि शुभाशुभ निमाले, पाप-पुण्य गेलें, जळौनियां ॥ ८१ ॥

## पापपुण्यलय.

म्हणौनु आत्मबोधां पाहालें, तेयां पापपुण्य आंधारें सरलें, शुभाशुभ गेलें, नाशौनियां ॥ ८२ ॥

ज्ञानियांच्या दृष्टी, पडलें भलें तैसेंहि कर्म त्रुठी, तोकरूपां दोषशृष्टी, परि बाधिजे ना ॥ ८३ ॥

अथवा अभक्ष भाक्षिलें, अपेया पान जालें, अहं कर्तें केलें, तेया बाधेना ॥ ८४ ॥

येऱ्हविं ब्रह्माहमस्मि बोधु, जया जाला विशुद्ध, तो त्या पापपुण्य सन्मंधु, कदाचि नाहीं ॥ ८५ ॥

जऱ्हि महायज्ञ केले, कां माहापाप घडलें, केलें कर्म मनिंहुनि सुनिटलें, तरि कवण भोगी ॥ ८६ ॥

मन पाप पुण्य करं, उन्मनी भोगे जरी, पाप पुण्य तरी, बाधिजे ना ॥ ८७ ॥

जैसा निरंजनी जळतु, सर्व तृणबीज जाळितु, तो अग्नि कां भोगितु, जळिनल्यातें ॥ ८८ ॥

तैसा अग्नीसादृश्य मुक्तु, जो तत्वबोधरतु, विधि-निषेधरहितु, बाधिजे ना ॥ ८९ ॥

अगम्य घडलें, अवश्यहि वधलें, जरि मन प्रवर्तलें, ऐसेयासि ॥ ९० ॥

तऱ्हि तो न बंधिजे, पुण्यपापें न घेपिजे, लिपिजे ना भुंजिजे, मनमुक्त जो ॥ ९१ ॥

ऐसें केवढें अगाध, आत्मतत्व महाबोध, पुण्यपाप फळउछेद, अविनाशु जो ॥ ९२ ॥

ऐसा गुरु तत्वोपदेशु केला, तव शिष्यु संतोषला, आणि कृताकृत्य जाला, परिपूर्ण तो ॥ ९३ ॥

अतःकरणिं सुटला, जिवभावां मुंकला, स्वयं बोधें बोधला, गुह्य सुखें ॥ ९४ ॥

ध्येय ध्याता विसरला, अखंडितु जाला, समदृष्टी मुक्तु मिसळला, तेया परी ॥ ९५ ॥

किंबहुना शिष्यु उपदेसिला, गुरुरहस्य पातला, परि आक्षेपु केला, तो आइका ॥ ९६ ॥

## आक्षेप.

तंव शिष्यु म्हणे जी ताता, मज कृपा केली आतां, तुमच्येनि प्रसादें तत्वता, कृतार्थु जालां ॥ ९७ ॥

तापत्रयें होतां तापलां, तुमचेया कृपा निवालां, परब्रह्म पातलां, अवाच्य जें ॥ ९८ ॥

गर्भवासु चुकलां, जन्ममरणां मुकला, जीव मुक्तु जालां, तुमच्येनि जी ॥ ९९ ॥

तुम्हीं सर्वकळासंपूर्ण, केला मिं परिपूर्ण, पण विनउनि पुसैन, तें सांघिजो जी ॥८००॥

मुक्तामुक्त कर्म केलें, करून मन उदास जालें तें न बंधे ऐसें बोलिलें, तें कैस्येनि जी ॥ १ ॥

असंभाव्य कीजे, आणि तेणें न बांधिजे, ऐसी मज नुपजे, प्रतीति हे ॥ २ ॥

देखा पां समर्थाचें रीण काढिजे, परि मर्यादांतिं घेइजे, काढुन न काढिल म्हणिजे, धरूनियां ॥ ३ ॥

तैसें केलेयां न केलें म्हणजि, मनें उदास होइजे, पण तेणेंचि बाधिजे, जेया परी ॥ ४ ॥

## समाधान.

तंव गुरु म्हणती सांधैन, आंगावरि काढिलें रिण, तो पातला मरण, तरि कवण मागे ॥ ५ ॥

तैसा मनें मनिं मेला, तरि कर्म भोगु चुकला, येरा प्रतिग्रहो ठाकला, अप्रचेया ॥ ६ ॥

## आक्षेप.

तंव शिष्यु म्हणे अवधारां, हें प्रतीती आलें उत्तर, पण संशयो माघारा, वर्ततु असे ॥ ७ ॥

तोही परियेसा सांघैन, विषयांवरि दावीन, दृष्टांतु बोलैन, आणिकु येकु ॥ ८ ॥

ब्राह्मणाची विधवा नारी, साशंकित पुरुषसंगु करी, ते गर्भाभिळाषु न करी, परि गर्भसंभवु होयेचि किं ॥ ९ ॥

जरि उदास वर्तली, आणि चोरिया प्रवर्तला, गुर्विणी झाली, जेयापरी ॥ १० ॥

तरी तो काय तिया मनोरथु धरिला, मग तियेप्रति फळला, तरि इछेविण जाला, गर्भु केवि ॥ ११ ॥

ते गर्भविषिं उदास, हा खीर भर्वसा, तरि संभवला आपैसा, गर्भु वाढे ॥ १२ ॥

एवं शिष्यु बोलिला, तंव गुरुनु दृष्टांतु दाविला, उपपत्ती आणिला, त्याचियें पैं ॥ १३ ॥

## समाधान.

गुरु म्हणे उपाओ नेणती, तयां गर्भकर्मं बांधती, येरी क्षारादिकें गाळिती, जाळौनियां ॥ १४ ॥

जैसा बिंदुप्ररोहो न पवे. तैसे उपाय जाणावे, वोषधिं जाळावे, गर्भस्थान ॥ १५ ॥

कां गर्भु संभवला जरि, आइकैं सल होतें परि, तिक्त क्षारिं, नास्ति कीजे ॥ १६ ॥

ते क्षार पथ्यकरी, तरि गर्भु जिरे जठरिं, सर्वेचि बाहिरी, गळौनु पडे ॥ १७ ॥

तैसें नांव क्षार, सर्व कल्मष संहार, कर्म फळ थार, होंचि नेंदी ॥ १८ ॥

अंतरिं तत्वावलोकन वर्त्तें, मना प्रतीती परौतें, तत क्षणींचि निवर्तें, कर्म गर्भु ॥ १९ ॥

ते अवळोकन ऐसें, जे शुद्ध जाणणें असे, समस्त दोष दृष्टि रुसे, रुसणे नसिं ॥ २० ॥

मिं जाणणें किं रुसणें, तेंहि गीळिजे जेणें, आणि केवळ उरे जे असणें, तेंचि तें जाण ॥ २१ ॥

ऐसा जो बोधु, तो समस्तां दोषां करि वधु, आणिकु येकु येकु बाळबोधु, बोलु परिस ॥ २२ ॥

तो दृष्टांतें तुं परीयासें, लोह लागलें परिसेंसि, तें सोनें होय अन्यासि, सूवर्ण तें ॥ २३ ॥

तरि तें काळेपण तें गेलें, परि तेंचि उजळ जालें, तेविं पशुपाश फिटले, प्रबोधतां ॥ २४ ॥

कां ज्योति तमीं प्रवेशे, आणि अंधकारु जातु न दिसे, ताचि प्रकाशे अनायासें, तेजगुणे ॥ २५ ॥

तैसें तत्वतेज निर्मळ, तेणें अज्ञान होये उजळ, निवर्ते अवलिला, कर्मतम ॥ २६ ॥

कामना न धरीतु, कर्म करी तो मुक्तु, तत्वदृष्टि अवलोकितु, प्राप्तु तो गा ॥ २७ ॥

## शिष्योद्धार.

एवं विधिं दृष्टांतिं, शिष्यासिं आलें प्रतित, म्हणें फिटली जि भ्रांति, तात्कालाचि पैं ॥ २८ ॥

संशय सल फिटलें, मन निशल्य जालें, मग म्हणें जी उद्धरीलें, कृपा करूनि ॥ २९ ॥

शिष्यू म्हणे ताता, निःसंशय जालां सर्वथा, परब्रह्मे-आ तृप्तां, केलें मातें ॥ ३० ॥

मानसें मनोरथु पुरला, आणि स्वात्मबोधार्थु बाणला, दुस्तरु तरला, भवसिंधु हा ॥ ३१ ॥

जि तुम्हां देवांचि उपमा देतां, न्यून हें सर्वथां, कैवल्य ज्ञान मज पाहाता, तुम्हिचि जी ॥ ३२ ॥

अंतष्करणीं बोधला, मग स्तुति करू लागला, तव गुरु निवारिला, संकेतें तो ॥ ३३ ॥

म्हणे रक्षिलां जि ताता, म्हणौनि चरणावरि ठेविला माथा, हे तत्व पाहातां, तृप्ति नाहीं ॥ ३४ ॥

हें मनाचि नाहीं सर्वथा, ते अनुपम्य साधतां, या आत्मसुखा आर्हता, तुम्ही केलि ॥ ३५ ॥

## गुरूचें सांगणें.

तव गुरुमूर्त्ति म्हणे पुत्रा, येथ तुजाचि आर्हता, हें आणिकासि सर्वथा, सांघो नये ॥ ३६ ॥

हें तुवांचि जाणावें, आणिकांसि न सघावें, सृष्टि-घातकां न व्हावें, आइक पुत्रा ॥ ३७ ॥

जो संसार सुखातीतु, आणि वैराग्य युक्तु, तो करावा तृप्तु, येरां सांघावें नां ॥ ३८ ॥

जेया विषयसुख न सरे, वैराग्य नाहिं पुरें, सांघितले-यांहि न पुरे, कांहिं केलें ॥ ३९ ॥

म्हणौनि तें सर्व गोप्य करावें, तुवांचि जाणावें, गुरु म्हणे न सांघावे, कव्हणा प्रति ॥ ४० ॥

ऐसेंहि जरि सांघितलें, तरि तुवां काये जाणितलें, मूर्खांसि येइल वहिले, प्रतीति कां ॥ ४१ ॥

जे विषयसुषे भुलति, ते ब्रह्म केवि जाणति, बापुडे ठाकति, चोचावले ॥ ४२ ॥

म्हणौनु सांघितलें नेणाति, विचंबले ठाकति, भ्रष्टा-भ्रष्टिं सिणाति, गर्भवासिं ते ॥ ४३ ॥

आतां जाणावें निगुतें, नेणणें रिगों नेदावें तेथें, एऱ्हावें गर्भवासि बहुतें, दुःखें असति ॥ ४४ ॥

## प्रश्न

गुरु ब्रह्मोपदेशु करिति, एर ते सर्वेचि विसरति, तयां कवाणि गति, शिष्यु पुसे ॥ ४५ ॥

## उत्तर.

तंव गुरु म्हणे महामति, आतां परिस ते गति, इच्छेच्या पावति, योगातें ते ॥ ४६ ॥

ते उत्तम कुळिं जन्मति, शुचि प्राज्ञ होति, आणि विधियुक्त भक्ति, करिति ते ॥ ४७ ॥

मग तोषे अनुक्रम पावने, पावे देवत्रय चिन्हें, तेयांचेनि मानें, आयुष्य भोगा ॥ ४८ ॥

मग तो मर्त्यलोकीं उपजे, माया मोहें न घेपिजे, आणि स्वयं ज्ञान सहजे, योगु पावे ॥ ४९ ॥

## शंका.

तव शिष्य म्हणे परियसा, तया तत्वज्ञा विधि काइसा, जो उतकर्षु स्वेच्छा, सर्व कार्मिं ॥ ५० ॥

## निरसन

तंव श्रीगुरु म्हणति, तेया देवांचि विघ्ने पडति, त्ये तेया करिति, उपसर्ग ॥ ५१ ॥

कव्हणी येकु ज्ञानाचिया चाडा, रिगाला वैराग्या फुढा, तव देवाचा घाडा, पडला तेया ॥ ५२ ॥

ज्ञान जाणावे या लागि, लागला गुरुचा संगि, तरि देवाचा आंगि, अग्नि जळे ॥ ५३ ॥

कऱ्हणा एकाचा विचारिं, देखिलि ज्ञानाचि उजिरि, तरि कुदळिघात वरि, आरोढिले ॥ ५४ ॥

देखां पां शुकदेवो चालविले, रंभेचें पोट चिरविलें, ऐसें अकृत्य केलें, केसणे पैं ॥ ५५ ॥

संन्यासि कां तापस, ज्ञानहीनि बहुवस, ते घडिये खापर सादृश्य, करून फेडी ॥ ५६ ॥

जरि म्हणसि कवण, तरि सान तें जाण, लोष्ट कपालि सहितु आपण, इद्र देखें ॥ ५७ ॥

हे बलि अविद्या करिति, उपसर्ग चिंतिति, आमचें पद इछिति, म्हणौनियां ॥ ५८ ॥

एऱ्हविं ज्ञानें जो सरिसा, तयासि विघ्नलेशु काइसा, हे साधकाचि दशा, सांघितली ॥ ५९ ॥

## प्रसादप्राप्ति.

तव शिष्यें विस्मयो केला, अंतष्करणीं संतोषला, मग चरणा लागला, श्रिगुरुचेया ॥ ६० ॥

चरणावरौनु उठविला, समीप बैसविला, मग म्हणे देवाहुनि आगळा, केलां तुम्ही ॥ ६१ ॥

हर्षविनोदें फुडा, नाचतु गुरुपुढां, तरिच्चि म्हणे मज गोड, दिधलें स्वामिं ॥ ६२ ॥

गुरुचरण मस्तकीं ठेविले, आणि पोटेंसि धरिले, मग हात पसरिले, प्रसादासि ॥ ६३ ॥

गुरूनि मूखिचा उगाळु दिधला, महाप्रसादु म्हणौनि येरें घेतला, मग शिष्यें पुसिला, सिद्धपंथु ॥ ६४ ॥

## सिद्धपंथ.

शिष्यु म्हणे ताता, कवण कवणा प्राप्ता, या वस्तू तृप्ता, अनंत सिद्ध ॥ ६५ ॥

आदिनाथा प्रसादें, उमास्वामिसंवादें, मछिंद्र प्रबोधें, प्रकट जाले ॥ ६६ ॥

जो पद पिंड ज्ञाता, निगाले करचरण दृष्टांता, तो जाण चौरंगीं सिद्धांता, कुळ दिपकु ॥ ६७ ॥

श्रीगोरक्षनाथु, देह सिद्धि सिद्धांत, परमतत्व विख्यात, आचार्ये जाण ॥ ६८ ॥

श्रीमुक्तादेवी योगीनि, जे समस्त सिद्ध शिरोमणि,
तिये प्रसादें चक्रपाणि, ज्ञानसिध्दु ॥ ६९ ॥

जळांधरु मेडुकि कंथाडि, धुंघडी, कापाडि, विरू-
पाक्षु ॥ ७० ॥

सर्व सुसावेरी, नागार्जुन कणेरी, लुइलाला कुकरि,
रत्नघोषु ॥ ७१ ॥

कान्हु कुदालि, दारिपु कलालि, भुसकु कांबळि,
कोरंटकु ॥ ७२ ॥

चर्पटि कर्पटि कांसारि, चाटु भाटु कुंभारि, कनखळु
मेखळु चमारि, साति तांति ॥ ७३ ॥

घटामहिषु चोखली, सर्व भक्षकु सिद्ध वरली, काश्यपु
चिहाळी, घट्ट मनाक्षु ॥ ७४ ॥

पंकजु दुखंडि, लिचका परखंडि, जळांधरु कवडि,
निर्गुण भंगी ॥ ७५ ॥

कुमुदु गुडरी, वोडिका कावेरी, पाहाणु सागरी,
अजपा बोधि ॥ ७६ ॥

अवधुतु गुंड मराउळ शबरी, मनु अजगीरि,
जिराबाई खेचरी, देमादेवी ॥ ७७ ॥

भाडु माहिळु चिंचणी, धामु धूम्र टिंटिणि, अतिबळु महाबळु माथणी, गोविंचंदु ॥ ७८ ॥

बोधि जैनंदु, कपाळि सोमचंदु, भर्तुरि विजयचंदु, ताल्हा तोलि ॥ ७९ ॥

चंडाळि हाडि, डोंकि घोडा चुळि, गोदाइ थाकडि, विमळनाथु ॥ ८० ॥

वणकाकळि, षडगु कोकावाळि, मेदाडि सुतली, सर्व भक्षु ॥ ८१ ॥

हरिध— .................. .................. .................. .................. .................. .................. .................. .................. देव, पर शिवा परौती धांव, महिमेसि गा ॥ १२ ॥

## गुरुभक्ति.

ईश्वर वाचा ऐसीचि, सर्व शास्त्रें सिद्धांत तैसेचि, तरि तुं गुरुद्रोहो कहिंचि, पडों नेदिं ॥ १३ ॥

गुरु जेथौनि देखिजे, तेथौंचि लोटांगण घालिजे, कां जिये दशि आइकीजे, नमस्कारिजे तया देशा ॥१४॥

गुरुस्थानिंहुनि आलें, कां गुरुकथन केलें, येर व्यापार राहाले, आइकावे या ॥ १५ ॥

ऐसी अनन्य भक्ति, तोचि उत्तम पुरुष असति, आणि गुरुभक्ती परौति, सिद्धि नाहीं ॥ १६ ॥

देहें मनें वाचा, गुरुसेवे आदरु जेयाचा, तरि शिवोस्मि हो तयाचा, बोधु वाढे ॥ १७ ॥

अज्ञान निःशेष जाये, केवळ ज्ञान राहे, आपणपें आपण पाहे, गुरुसेवा पैं ॥ १८ ॥

ऐसे आपणयेंनि फळलें, जें अटक गुरुसेवाबळें, परि गुरुवचन केवळें, उलंघावें ना ॥ १९ ॥

गुरु करिती तें न करावें, गुरु बोलती तें न बोलावें, आणि गुरुचें न चोरावें, कांहिंच गा ॥ २० ॥

गुरु सांघती तें कीजे, गीत कां शास्त्र नोचरीजे, गुरुसिं पाठांतर न कीजे, गीत शास्त्रिं ॥ २१ ॥

गुरु जिये आसनीं बैसति, कां भुवनीं जिये वसती, तिये सेवाबुद्धि पूजीजति, चित्तशुद्धि ॥ २२ ॥

गुरुचे गुरु तेही मनी धरीजती, गुरु तार्वि पूजीजति, गुरुनाममाळा वाइजती, वैखरीसि ॥ २३ ॥

## गुरुद्रोह.

ऐसें जो न करी, तो आपणप्यां वैरी, आणि निरययोनि माझारि, पडे तो पैं ॥ २४ ॥

जे गुरुसि वादु करिती, आणि वेद निंदा करिती, ते ब्रह्मघातक होती, महापातकी ॥ २५

गुरु वचन मनिं न धरिती, गुरुसिं अहंकारु करीती, तो जाचिजे अघोरिं, गभवासिं ॥ २६ ॥

गुरुवचनांचेनि अहंकारें, कुकर्में पतितु आचरे, आण गुरुचें विसुरे, नाहिं करी ॥ २७ ॥

ज्ञानी जो विविधु, ऐसा जो असे समंधु, तो लोपौनि अपवादु, आचरे जो ॥ २८ ॥

तो कल्प संख्या वर्षें, असे तो अवगती मुखें, भोगौ-नियां निमिषें, रोगिया होए ॥ २९ ॥

जऱ्हीं जाला त्रिकाळवेत्ता, सिद्ध लक्षणीं पूरता, परि गुरुत्यागें सर्वथा, नरक भोगी ॥ ३० ॥

जेणें गुरुसेवा लोपिली, प्रमाणक्रिया लंघिली, तेणें अधोगती आपुली, वृत्ति केली ॥ ३१ ॥

जो गुरुतें त्यजूनु जाए, निंदा पैशुन्य खाए, तो पापिया योगी नव्हे, वस्तु करूनु ॥ ३२ ॥

ऐसिया अभक्ती, आपुले गुरु लंघिती, मग आणिकासिं करिति, पुश्चळीकें ॥ ३३ ॥

पहिले येकुरुकरीती. एकुचि दिसु मानिती, मग नावडे तरि करीती, आणिकु येकु ॥ ३४ ॥

ऐसे गुरु सांडोवे करिती, तैसेचि गुरुद्रोहिं पडती, तयाचि परी भोगीती, गर्भवासु ते ॥ ३५ ॥

गुरु करावेया करिती, मग करुनियां सांडिती, हीण ते त्यजीती, पापबुद्धी ॥ ३६ ॥

तेयां गुरुवधाचें पाप घडे, आणिक शिवद्रोहो पडे, ते अधोगती रोकडे, घालीजती ॥ ३७ ॥

## प्रश्न.

तंव शिष्यु म्हणे स्वामी, कांहि येक पुसैन जी मिं, तें प्रसन्न होउनि तुम्हीं, सांघावें मज ॥ ३८ ॥

एक खंडज्ञानीं लागले, येक मंत्रयंत्रिं जडले, अधमोपदेशिं पडले, अघोरे पैं ॥ ३९ ॥

## उत्तर.

तंव गुरु म्हणती, ते आधिंचि कां नेणती. मग करूनियां करिती, विचारु कां ॥ ४० ॥

ते साच किं लटिकें, हें आधिंचि जाणावें निकें, नाहिं तरि साशंके, पात्र होइजे ॥ ४१ ॥

आधीं घडफुडें विचारिजे, मग गुरु कीजे, जेवि कुळकन्या वरिजे, जाणौनियां ॥ ४२ ॥

मग केलेयावरि ऐसी, हे चिखिमिखी काइसी, परि आणिकु परियेसिं, उपाओ असे, ॥ ४३ ॥

तरि जयाचा अनुग्रहो आधिं, तयातें पुसावें त्रिशुद्धी, तै आणिकी ठाइं बुद्धि, करूं लाहे ॥ ४४ ॥

कां आधिला गुरुचोनि अभावें, आणिका गुरूतें भजावें, तैं दोषातें न पवे, साधकु तो ॥ ४५ ॥

गुरु देवंगत होती, कां दिपांतरा जाती, तेया वांचूनु आणिके ठाइं संगती, करूंचि नये ॥ ४६ ॥

जो योगु पहिलिये ठांइ सांघती, तोचि संवादु आणिकी ठाइं देखती, तरि आधील गुरु मानिजती, त्रिशुद्धि गा ॥ ४७ ॥

येऱ्हवीं कपाळीं जडे, नाथिला दोषु घडे, जैं आंधळें पडें, करांडिसि ॥ ४८ ॥

निर्देवें मानें शुद्ध नव्हति, मग गुरूवरि गुरु करिति, ते तैसेंचि लोटिजाति, अधोगति ॥ ४९ ॥

सदैव तो कोलि भला, जेणे मातियेचा द्रोणु केला, तेयाचा ऐसा विश्वासु जाला, तरि आसिद्धु कवणु ॥५०॥

कां सति सावित्रि होउनि, लग्न लागतांचि निधान, भर्तारांचें आइकोनि मन, दृढ चित्त केले ॥ ५१ ॥

ऐसा विश्वासु जेथें, ते तत्पुरुषु निगुते, जे लोटतेयां जुगां मागुते, स्थिर करितीं ॥ ५२ ॥

जो पहिला संकल्पु उठिला, तो तेणें साच केला, तरि शिष्यधर्मु चालता केला, सदैवे तेणें ॥ ५३ ॥

एऱ्हावीं गुरू कीजे, तो मना नये तरि आणिका भाजिजे, तरि गुरुद्रोही कोठें ठेविजे, अधर्मासि ॥ ५४ ॥

ऐसा अप्रमादु न घडे, तेयाचें ज्यालें वाढे, आणि जिवे ते पुढें, तेया ठाके ॥ ५५ ॥

म्हणौनि प्रयत्नें सेवा कीजे, मनोवृत्ति भंगो नेदिजे, अवज्ञाने देखिजे, गुरुदेवासि ॥ ५६ ॥

ईश्वरादिक कोपति, ते श्रीगुरूनि राखिजति, आणि श्रीगुरु कोपति, तरि कवणु राखे ॥ ५७ ॥

जो गुरूचा मनीं नुरेचि, तो असतां बोधु न पवेचि, कर्मिरूप वसेचि, अर्धकूपीं ॥ ५८ ॥

गुरु येणें आकारें, उमासहितु हरिहरें, वसिजे चराचरें, श्रीगुरू मूर्त्ति ॥ ५९ ॥

ब्रम्हाकोटि मध्यस्तु, जितुके कांहिं वर्तत, तें श्रीगुरु चरणीं वसत, नितिवंत पैं ॥ ६० ॥

गुरुचरण सेवौनि, आगि हात लावौनि, जिये जळें येति स्पर्शौनि, तिये तिर्थरूपें ॥ ६१ ॥

गूरु तिर्थरूप जाणिजे, अवज्ञाभेदे न देखिजे, द्रोहो पडो नेंदिजे, दोषदृष्टि ॥ ६२ ॥

हे सिद्ध धर्म साधिति, जे ईश्वर बोलिजति, ते आम्हि तुजप्रति, सांघितले ॥ ६३ ॥

## प्रश्न.

तव शिष्यु म्हणे ताता, गुरु सेविजति आत्महिता, परि प्रमादवशें अवचिता, द्रोहो घडे ॥ ६४ ॥

तरि जे याचेया उत्तर, गुरुद्रोहो घोष निस्तर, ऐसेयाच्या उपसारा, सांघिजो जि ॥ ६५ ॥

## उत्तर.

तव संतोषौनि गुरुनाथें, म्हणितलें शिष्यातें, आगा गुरुद्रोहो निवर्ते, गुरुकृपा वि ..............

.............. ..............

.............. .............. ..............

......सें शिष्यु म्हणे, आतां जाणिजैल कवणें, मज बोलतांचि अवघडवाणें, बोलणें जें ॥ ९२ ॥

जें हालऊनि न हालणें, नेदखौनि देखणें, सघणवट असणें, व्योम जैसें ॥ ९३ ॥

जें जाणणैंचि केवळ, स्वरूपाचि निश्चळ, ते म्यांचि मिं निष्फळ, जाणितलें जी ॥ ९४ ॥

ऐसें जाणणें निवडलें, जैसें पाहलेंचि पाहालें, तेंचि तें लाघलें, म्यांचि मातें ॥ ९५ ॥

ऐसा बोधाचा केवळु, केला मज सुकाळु, कीं जाणावें या अळुमाळु, उरेचि ना ॥ ९६ ॥

किं जाणणेंचि जालें, किं जाणावें या मूळ आलें, आतां द्वैतभाव गेले, नाशौनियां जी । ९७ ॥

आतां जैसें असें तैसें, असताचि असे, असणेंचि असे, अदृश्या शिउ ॥ ९८ ॥

ऐकांतासि येकांतपण, परिपूर्णी परिपूर्ण, चतुष्टयासि कारण, निर्गुण जे ॥ ९९ ॥

जे येकलेंचि येक, आणि शषासि शेष, सुखासि सुख, सुखाचि जें ॥ १००० ॥

जें सदा तृप्त तृप्तवंत, आपणांपांचि निवडत, आपणपेंचि आपण असत, आपणपेंसिं ॥ १ ॥

तुम्हीं कृपादृष्टी पाहिलां, मग आपणपेंचि उठिला, किं उठिलेंपणें जालां, आपणपेंचि ॥ २ ॥

आणि आपणपेंविण कांहिं, विश्वि दुजेंचि नाहिं, अंतिं बोलणेयांचि लिहि, पुसिली जी ॥ ३ ॥

आतां बोलणेयांचा मागु मोडिला, चतुंष्टयाचा ठाओ फेडिला, तो पैलुपारु पातला, तत्वकृपा ॥ ४ ॥

तुमचिया कृपेच्या भरोवरी, प्रपंचा केली बोहरी, कीं दुसरेपण निदसुरी, सांडौनि गेलें ॥ ५ ॥

आतां संसारशंका फीटली, पंचमहद्भूतिं भूतें विरमलिं, ऐल पैला मिळालिं, भवबीजेंसिं ॥ ६ ॥

जिवाची जिवदशा गेली, आणि शिवाची विवंचना ठेली, स्वमेव प्रतीति जाली, अबोलणें जें ॥ ७ ॥

जी भ्यां आपणपें देखिल ऐसे, न देखणेयां सारिखे जैसे, नेणणेयां सारिखें असे, एकचि जें ॥ ८ ॥

ऐसें जें ब्रह्म अमित, अंतर्बाह्य भरीत, संपूर्ण दावित, जालेपणें ॥ ९ ॥

शिष्यु बोलावें तें बोलिला, मग निवांतु बोल नुठेला, अवळोकुं लागला, गुरुमूर्तीतें ॥ १० ॥

ऐसा श्रीगुरूचि जाला जाणीतला, प्राप्तीतें हा पातला, आतां स्वरूपिं आपुला, घालुं यासि ॥ ११ ॥

गुरु म्हणती शिष्यु मुक्तु भला, भिंचि तें हा जाला, आतां करुं आपुलां, निजभक्तु ॥ १२ ॥

तंव श्रीगुरु जाले प्रसन्न, पसरौनि विशाळ वदन, जैसें उजळलें गगन, चंद्र बिंबिं ॥ १३ ॥

मग श्रीगुरु म्हणती शिष्यातें, आतां तुं प्रवेश गा येथें, पावलासि मातें, अभेदरूपें ॥ १४ ॥

ऐसा ध्वनि आइकिला, तंव शिष्यु मुखिं प्रवेशला, जैसा प्रकाशु मीनला, प्रकाशासि ॥ १५ ॥

कां समुद्रिं समुद्रु मिसळला, कां आकाशिं आकाशा-ल्यो जाला, हरिहरां जाला, ऐक्यवादु ॥ १६ ॥

तैसें उभयतां मीनलें, ब्रह्मतेजि येकवाटलें, गुरु राशि वाढीनलें, असंख्यात ॥ १७ ॥

गुरुनु शिष्याचा घोंटु भरूनु, आपणयांहिं मिठी देउनु, प्रतीतिमागु सांडौनु, राहिला पैं ॥ १८ ॥

आतां मागां पुढां एकुचि, घनदाट गुरुचि, तया सुखा न येचि, रूप करूं ॥ १९ ॥

गुरु शिष्य येक जाले, तें जालेंपणहि गेलें, गेले-पण राहिले, वटेश्वरिं ॥ २० ॥

ऐसा शिष्यु गुरुभक्ति बोधला, वेदगुह्य पातला, कविता धर्मं संपला, प्रबंधु हा ॥ २१ ॥

हे चतुर्विध भक्ति, हा पांचवां पुरुषार्थु जाणती, ते कष्टिं समाप्ति, पावविली ॥ २२ ॥

मऱ्हाटी बोलिलां आरज, बाळबोधपणें त्रिरज, गुरुवटेश्वरिं वाइली पुजा, चांगा म्हणे ॥ २३ ॥

सर्व तीर्थ यज्ञ फळ, पाविजे अवलिळ, हे कथा परिसतु निर्मळ, श्रोते वक्ते ॥ २४ ॥

वटेश्वराचा सुतु, चांगा म्हणे अवधुतु, सिद्धसंकैतें मातु प्रगट केली ॥ २५ ॥

हा ग्रंथु पावला समाप्ति, तै शाळवाहनु शकु किती, कवण संवत्सरु मासु तिथी, वारु कवणु ॥२६॥

कवण क्षेत्र स्थान देवता, कवण गंगा तीर्था, कैसी महिमा कवणु सेवित, पृथज्ञ सांघों ॥ २७ ॥

शकें चौतिसें बारा, परिधावी संवत्सरा, मार्गशिर शुद्ध तीज रविवार, नामसंख्य ॥ २८ ॥

हरिश्चंद्र नाम पर्वतु, तेथ महादेओ भक्तु, सुर सिद्धगणीं विख्यातु, सेविजे जो ॥ २९ ॥

हरिश्चंद्र देवता, मंगळ गंगा सरित, सर्व तीर्थ पुरविता, सप्तस्थान ॥ ३० ॥

ब्रह्मस्थळें ब्रह्म न संडितु, चंचळ वृक्षु अनंतु, लिंगिं जगन्नाथु, महादेओ ॥ ३१ ॥

ऐसा सर्वांचा समाओ, कळी संसारु दुःखाचा प्रवाहो, ता देओ मोक्षाचा उत्साओ, शनैः शनैः ॥ ३२ ॥

जो तीर्थांसि तीर्थ, केदारींसिं तुकिताति, आणि क्षेत्रिं निर्मीती, प्रबंधु हा ॥ ३३ ॥

आतां गणनाथ सरस्वती नमस्कारु दिनप्रती, जिहिं योगनिर्वाणसमाप्ति ग्रंथु नेला ॥ ३४ ॥

इति गुरुशिष्य संवादे, तत्वसार प्रबंधे, कथिलें वटेश्वरप्रसादें, योगरहस्य हें ॥ ३५ ॥

ऐसी चतुर्विध भक्ती रसाळ, वोविया दसाउशात रत्न-माळ, वाइली वटेश्वरचरणयुगळ, चांगा म्हणे ॥३६॥

॥ इति श्री गुरुशिष्य संवाद तत्वसार पूर्णामिति ॥
॥ शुभं भवतु । श्री वटेश्वरार्पणमस्तु ॥

शके १४८३ दुर्मतिनाम संवत्सरे अषाढ शुद्ध १ शुक्रे तद्दिने पाथरी स्थाने केदारलिंग समीपे बोप पाठकेन इद पुस्तकं लिखितं ॥ शुभं भवतु ॥ लेखकपाठकयोर्विजयी रस्तु ॥ शिवार्पणमस्तु ॥

# टीपा.

ॐ नमः कुंजरेश्वराय---हा प्रणाम ग्रंथलेखकानें केलेला आहे कीं ग्रंथकर्त्या चांगदेवानें, हें सांगणें कठिण आहे. कुंजरेश्वर नांव संस्कृत वाङ्मयांत उपलब्ध नाहीं. याचा अर्थ गणपति होऊं शकेल किंवा हें एकाद्या कुलदेवतेचेंही नांव असूं शकेल.

(१)

म्यां---जुन्या मराठींत म्यां, मियां व क्वचित् मेयां अशीं रूपें आढळतात. संस्कृत 'मया' वरून हीं रूपें झालीं आहेत.

गणेश्वरु---गणपति. अकारांत नामें, विशेषणें व कांहीं धातुसाधितें जुन्या मराठींत उकारांत वापरलेलीं आढळतात.

कल्मक्षवनकुठारु---पापरूपी वनाचा नाश करणारा. 'कल्मक्ष' हा शब्द सं. 'कल्मष' याचा अपभ्रंश आहे. अशा प्रकारचीं रूपकें मराठी जुन्या वाङ्मयांत हवीं तेवढीं सांपडतील. याच ग्रंथांत अशा रूपकांची रेलचेल कमी नाहीं. 'कल्मष ध्वंसकारी' पद हितोपदेशांतही सांपडतें.

(२)

सौजन्यांचा अंकुरु---चांगलेपणाचा कोंभ. प्रथम पदावरील अनुस्वार लेखकप्रमादानें आला असावा. वरील प्रकारचेंच हेंही रूपक आहे पण येथें समास न वापरतां विग्रहवाक्य वापरलें आहे.

शब्दब्रम्हविद्या---वेदविद्या.

उन्मेष---या शब्दाचा मूळ अर्थ डोळे उघडणें असा आहे. यावरून पुढें याचा अर्थ अज्ञानांधांचे डोळे उघडणारें ज्ञान असा झाला. येथें याच अर्थानें हा शब्द आला आहे. ज्ञानाचा तरुवर हाच खरा कल्पवृक्ष म्हणजे ज्ञान हेंच खरोखर कामना पूर्ण करणारें आहे.

(३)

डुल्लत्तु—डुलत असतो. या प्रकारच्या धातुसाधित विशेषणाचें रूप प्रायः उकारांत सांपडतें. शेवटील तकाराचें द्वित्व मागील लकाराच्या द्वित्वामुळें आलें आहे.

अभिनवितु—अभिनय करितो. 'य' चा 'व' झाला आहे.

(४)

कुविद्याभरणहुताशनु—चांगदेवानें या ओंवींत अविद्या व कुविद्या यांतील भेद मोठ्या गमतीनें दाखविला आहे. अविद्या म्हणजे विद्येचा अभाव हा स्वाभाविक असतो. विद्या शिकण्यापूर्वीं प्रत्येक मनुष्य अविद्यच असतो. म्हणून अविद्येस स्वाभाविकपणें वाढणाऱ्या गवताची उपमा दिली आहे. पण कुविद्या ही स्वाभाविक नसून स्वतः मिळविलेली असल्यामुळें कृत्रिम व म्हणूनच अलंकारा सारखी असते. अलंकारा प्रमाणेंच कुविद्येचीही माणसास ऐट असते. चांगदेवास स्वतःच आपल्या कुविद्येची जाणीव असल्यामुळें त्याज कडून हा भेद दाखविला जाणें अपरिहार्यच होतें. ज्ञानाग्नीस अविद्या तृणास जाळणारा पण कुविद्याभरणाची आहुति खाणारा मुद्दामच म्हटलेंसें वाततें.

ज्ञानाज्ञी—ज्ञानाग्नि, असा पाठ हवा.

(५)

गिरिजे शंभुचा—गिरिजेचा म्हणजे पार्वतीचा व शंभु म्हणजे शंकराचा. चांगदेवाच्या भाषेंतील हें प्रथम पदाचें सामान्यरूप ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. हिंदींत हा प्रघात सरसहा चालू आहे.

(६)

वाचा प्रदक्षिणा करुनु—वाणीनें प्रदक्षिणा करून. वाचा हें संस्कृत तृतीयैकवचनांत रूप मराठींत बरेच वेळ तसेंचे तसेंच सांपडतें. उदाहरणार्थ कायावाचामनें. आणखीही कांहीं संस्कृत रूपें मराठींत तशींच राहिली आहेत. जसें राजश्रिया विराजित. ऊन प्रत्ययांत धातुसाधित अव्ययाचें उकारांत **रूप** श्रीशिवाजी माहराजांच्या वेळच्या पत्रव्यवहारकालापर्यंतही सांपडतें.

साष्टांगि प्रणमुनु—साष्टांग नमस्कार. 'प्रणमुनु' हें रूप 'प्रणमनु' असें पाहिजे. कारण येथें हें ऊन प्रत्ययांत धातुसाधित नसून नाम आहे. साष्टांग नमस्काराची प्रथा महाराष्ट्रांतील असून ती अजूनही 'सा. न. वि. वि.' यांत संक्षेपानें विद्यमान आहे. 'साष्टांगीं नमन करुनि आठ वण' या आर्याचरणांत पंतांनींही साष्टांग नमस्कारांमुळें दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, छाती व शिर या आठ अंगांस घट्टे पडण्याच्या प्रघाताचा उल्लेख केला आहे.

(७)

मूळिका—मूळ, मुळी.

काश्मिरीची नायिका—विद्येची अधिदेवता. काश्मीर देश दहाव्या शतका पासून बाराव्या शतकापर्यंत विद्येचें माहेरघर झाल्यामुळें त्याकाळीं काश्मीरी हा शब्द विद्या किंवा विद्वानांचा वाचक झालेला होता.

बुधीसी—बुद्धीस.

वागेश्वरी–संस्कृत 'वागीश्वरी' चें मराठी अपभ्रष्ट रूप.

(८)

गोक्षीरधवळ–गाईच्या दुधाप्रमाणें शुभ्र.

उभयकुळ—सासरचें व माहेरचें अशीं दोन्हीं कुळें. सरस्वती,—ब्रम्हपुत्री व शिवस्नुषा असल्यानें—तिची दोन्हीं कुळें शुद्धच होतीं.

(९)

जिये—जिला.

पाशांकुशधरण—फांस व अंकुश यांचे धारण. चांगदेव यानें शारदेचें 'वीणा पुस्तक धारिणी' असें वर्णन केलें नसून 'पाशांकुशधारिणी' असें केलें आहे. यावरून त्याचे मतानें विद्या ही केवळ विनोद व आनंद उत्पन्न करण्यापेक्षां चित्तास' बांधणारी व इष्टकार्याकडे प्रवृत्त करणारी आहे. 'योगश्चित्तवृत्ति निरोधः या तत्वाप्रमाणें वागणाऱ्या योगेश्वरास हें साजेसेंच आहे.

महिमाग्नें—लेखकाच्या प्रमादानें हा शब्द असा लिहिला गेला आहे. 'महिमा' हीं तीन अक्षरें लिहिल्यावर पुढच्या 'गहन' शब्दांतील 'ग' लिहिला गेला. पण काना देऊन त्यास पुरा करण्यापूर्वींच लेखकाच्या लक्षांत आपली चूक आली व त्यानें 'नें' हें अक्षर लिहिलें. पण 'ग' चा अर्धभाग खोडावयाचा तसाच राहिला. येथील शब्द 'महिमानें' म्हणजे मोठेपणामुळें, असा आहे. १३व्या ओंवीचा प्रथम चरण 'जे महिमानें गहन' असाच आहे.

(१०)

नवरस—शृंगार, हास्य, वीर, करुण, रौद्र, भयानक, बीभत्स, अद्‌भुत व शांत, हे नऊ रस.

सप्तस्वर—षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद हे सात स्व र

(११)

अती, तिं—येथें कांहीं लेखन दोष असावासें वाटतें. अर्थ स्पष्ट लागत नाहीं.

(१२)

लंबिके, खेचरी—हीं दोन्हीं योग शास्त्रांतील देवतांची नांवें आहेत. या नांवाच्या मुद्राही आहेत.

(१३)

अनुवादली—बोलली. सरस्वती प्रसन्न होऊन 'भलारे' असें म्हणाली.

(१४)

आतां—येथें प्रथम पृष्ठ संपलें. पुढचीं पत्रें न मिळाल्यानें पुढें काय असेल हें सांगतां येत नाहीं. पण गणेशशारदावंदना नंतर बहुधा गुरुवंदन असेलसें वाटतें. हें सांपडतें तर चांगदेवाच्या गुरूबद्दल कांहीं माहिती विशेष मिळण्याचा संभव होता. येथून पुढचीं १९ पत्रें म्हणजे ५९० ओंवी पर्यंतचा भाग गहाळला आहे.

(५९०)

देह अहंतेसिं—देहाभिमानास. या ओंवींत वैराग्याची अत्यंत सुंदर व्याख्या दिली आहे. देहाचा अभिमान सोडणें याचेंच नांव वैराग्य. 'रुसणें' या शब्दानें

फारच बहार केली आहे. समर्थांच्या 'प्रीतिविण रूसूं नये' या सांगण्याप्रमाणें देहाची प्रीति अगदीं स्वाभाविक आहे. पण तरीही देह आपला आहे ही गोष्ट ठाऊक असूनही त्याचा अभिमान न बाळगणें हेंच खरें वैराग्य.

इछा—इच्छा.

आपेसें—आपें आप. याचें शुद्ध रूप आपैसें. हिंदी 'आपहीसे' पासून आपईसें. आपैसें, आपेसें असें झालें असावें.

(५९१)

अष्टांग योग भ्यासु—अष्टांग योगाभ्यासु. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि हीं योगाचीं आठ अंगें.

परमहंसु—योग्यांच्या कोटींतील श्रेष्ठ कोटीचा पुरुष.

(५९२)

गोप्य गव्हर—न सांगण्यासारखें गूढ.

सकळै—सकळही. 'ह' चा लोप होऊन सकळइ, 'सकळै' असें रूप झालें आहे. आपैसें हा शब्द पहा.

निःशब्दाधार—शब्द रहित अनुभवाच्या आधारावर.

(५९३)

उजेडें—उघडपणानें, स्पष्टपणानें.

(५९४)

सोपानें—क्रमाक्रमानें, पायरी पायरीनें.

बोलिजैल—बोलिलें जाईल. धातूस 'इजैल' हा प्रत्यय लाऊन जुन्या मराठींत कर्मणि रूप होत असे.

चांग—चांगलेपणानें.

(५९५)

परियेसा—ऐका. हा धातु संस्कृत 'परीष्' पासून निघाला आहे. 'परीष्' चें भाववाचक नाम पर्येषण होऊन परियेषणें, परियेसणें या क्रमानें हा मराठींत उतरला.

निर्गुणभक्ति--चांगदेवानें येथून या भक्तीचें वर्णन केलें आहे. स्थूलभक्ति व सूक्ष्म भक्ति या दोन प्रकारांचें वर्णन गहाळ झालेल्या ग्रंथभागांत असावें.

चांगा--या नावानें चांगदेव स्वतःचा उल्लेख करितो.

वातिवरी--बारा अंगुळावर. हा नाथ सांप्रदायांतील शब्द आहे. 'तो वातिवरी पवनु, गिवसिता न दिसे' असें ज्ञानेश्वरहि म्हणतात. दोन्ही नाकपुड्यांतून जो वारा वाहत असतो त्याची मर्यादा बारा अंगुलांची आहे. त्याच्या आंत.

गिवसितां--सांपडलें असतां. संस्कृत 'गवेषणा' या पासून हा धातु झालासें वाटतें.

(५९७)

पापा पुण्यापूर्वीं--पाप व पुण्य यांच्या कल्पनांचे आधीं. प्रथम पदाच्या सामान्यरूपाकडे लक्ष दिलें पाहिजे.

चेववि--जागृत करी.

(५९८)

धुणी--नाश करी.

(५९९)

आहो--अहो. वाचकांचें किंवा श्रोत्यांचें लक्ष वेधण्यासाठीं वापरलेलें संबोधन.

इये परौति--इच्याहून पलीकडची म्हणजे श्रेष्ठ.

(६००)

वटेश्वराप्रसादें--वटेश्वराच्या कृपेनें. 'र' चा काना लेखक प्रमादानें पडलेला दिसतो. वटेश्वरा बद्दलची माहिती उपोद्धातांत पहावी.

आइकतु--ऐकोत. आज्ञार्थी संस्कृत उकारांत धातुरूपावरून हें रूप प्रचारांत आलें. पुढें शेवटचा 'उ' उपांत्य स्वराशीं मिळून आइकोत-ऐकोत असें रूप झालें. आ+ईक्ष् या संस्कृत धातूपासून ऐकणें हा धातु जन्मला आहे. अजूनही

एकाद्याचें ध्यान आकर्षण करून त्यास ऐकावयास लावावयाचें असतां आपण 'हें पहा' म्हणतो.

जिया—जीमुळें. संस्कृत 'यया' पासून.

(६०२)

रूपरूपातित पदा—रूप व रूपातीत या नांवाची.

सानंद—चांगदेव ओंवीच्या यमकाबद्दल बराच बेफिकीर दिसतो. येथेंच धा, दा, व द चें यमक आहे.

(६०३)

पाप्ति—प्राप्ति.

विरिति—'व्युत्पत्तिचें' अपभ्रष्ट रूप.

प्रथक्—पृथक्, वेगळेपणें.

(६०४)

कुंडलिणि शक्ति—कुंडलिनी नांवाची एक नाडी शरीरांत आहे. ही जागृत करणें योगाचें एक मुख्य कार्य आहे. ज्ञानेश्वरी अ. ६, ओंव्या २२१ ते २९१ यांत कुंडलिनी, तिची जागृति व त्या पासून होणारा परिणाम फारच सुरस रीतीनें सांगितला आहे. या ग्रंथांतही पुढें थोडेंसें कुंडलिनी-वर्णन आहेच.

म्हणोरतो—म्हणिरणें या धातूचा प्रयोग या ग्रंथांत बरेच वेळा केला आहे. कर्तरि रूप म्हणिरणें व कर्मणि म्हणिजणें.

एर—इतर. याचें येर असेंहि रूप आढळतें.

( ६०५ )

सांधिजैल—सांगणें याचें रूप बरेच वेळां सांघणें असें घकार युक्त सांपडतें.

नागरु—चांगल्या रीतीचा. नगर पासून हा शब्द झाला आहे. नगरांत शोभेसा.

अवधानें—अवधान, ध्यान. न वरील मात्रा पुढील दे मुळें लेखकप्रमादानें पडली असावी.

(६०६)

वोंकार—ॐकार. शब्दांच्या आरंभीच्या ओकारा बद्दल वोकार व एकाराबद्दल येकार नेहमीं येतो.

(६०७)

तस्य—संस्कृत रूप जसेंच्या तसेंच आलें आहे.

मन व्योमा पासोनु—मनाच्या आकाशा पासून म्हणजे पोकळींतून.

(६०८)

मन बुद्धिचा गव्हरी—मनाच्या व बुद्धीच्या गूढ ठिकाणीं. 'च' याच्या मराठींतल्या दुहेरी उच्चारामुळें पुष्कळ ठिकाणीं 'च' च्या जागीं 'च्य' व 'च्य' च्या जागीं 'च' लिहिला जातो. उदाहरणार्थ येथेंच 'च्या' चे ऐवजीं 'चा' लिहिला गेला व पुढच्याच चरणांत 'चारि' च्या जागी 'च्यारि' लिहिलें गेलें. या चारी प्रकाराच्या वाणींचें वर्णन समर्थांनींही दासबोधांत दशक १७वा, समास ८वा, ओंव्या १ ते ३ मध्यें केलें आहे.

(६०९)

मात्रवृता—मात्रावृता. निवळ इंद्रियानें युक्त. भगवद्गीतेंतहि 'मात्रा' शब्द याच अर्थी 'मात्रास्पर्शा:' या पदांत आला आहे.

परमात्मेया—परमात्म्याचा.

घोषु—घोष, ध्वनि, नाद, व शब्द या चार निरनिराळ्या एका पुढील एक पायऱ्या आहेत. अत्यंत सूक्ष्म तो घोष, नंतर ध्वनि, किंचित्स्थूल तो नाद व दुसऱ्याच्या श्रवणेंद्रियास गोचर तो शब्द.

(६१०)

पश्यंति—पश्यंती. परेच्या पुढील वाणीचें स्वरूप. परा ही पूर्णपणें अव्यक्त, दुसऱ्याच्या नजरेस येणारी ती पश्यंती, ओंठ हालावयास लागले कीं मध्यमा व स्पष्ट ऐकूं येऊं लागली कीं वैखरी, असे वाणीचे चार भेद केले आहेत.

(६११)

स्थूल बीज—स्पष्टपणें ध्यानांत आणून देणारें अक्षर. बीज किंवा मातृका ही तांत्रिक विधींतील विशिष्ट अक्षरें आहेत. निरनिराळया देवतांसाठीं हीं निरनिराळीं मानलीं गेलीं आहेत.

(६१२)

हंस वाक्य—'हंसः' हें वाक्य. हें अहं सः ह्मणजे मी तो (च आहे) या वाक्याचें संक्षिप्त रूप. प्रत्येक श्वासा बरोबर वायु आंत ओढला ह्मणजे 'सः' या सारखा व वायु बाहेर पडला ह्मणजे 'हं' या सारखा नाद होतो या प्रत्येक श्वासोच्छावासा बरोबर तो मी, तो मी, ही भावना जागृत ठेवणारें तें हंस वाक्य.

(६१३)

बिंदनादभरितु—बिंदु ह्मणजे अनुस्वारासारख्या नादानें युक्त.

बिजद्वय—बीजद्वय.

शिउशक्ति—शिव शक्ति. 'हं' हें आत्म सूचक अक्षर शिवाचें व 'सः' हें अन्य-सृष्टिसूचक अक्षर शक्तीचें द्योतक मानलें गेलें आहे. 'शिव' यांतील 'व' च्या जागीं 'उ' आलेला दिसतो. याच प्रमाणें 'जीव' याचेंहि लेखन 'जीउ' असें आढळतें.

(६१४)

अजपा—जिचा जप करावा लागत नाहीं ती अजपा. 'ॐ हंसः' या अक्षरांच्या नादाची पुनरुक्ति ह्मणजे जप. तोंडानें जप न करितां प्रत्येक श्वासोच्छवासा बरोबर होतच असतो ह्मणून योगी लोक या मंत्रास 'अजपा गायत्री' असें ह्मणतात.

(६१५)

आतां—आंत च्या ऐवजीं लेखकप्रमादानें आतां लिहिलें गेलें.

पृथग्बीजें—निरनिराळीं बीजाक्षरें. आंत प्रवेश केला कीं सृष्टि व बाहेर पडलें कीं संहार. 'यदिदं किंच। तत्सृष्ट्वा। तदेवानुप्राविशत्।' या ब्रह्मोपनिषदांतहि हेंच सांगितलें आहे. ह्मणून मायेचें किंवा सृष्टीचें बीज सकार व ईश्वराचें आत्मप्रतीक बीज हकार अशीं निरनिराळीं बीजाक्षरें आहेत.

(६१६)

अवरोहिं विरोहि—चढ उतारांत. श्वासाच्या आंत बाहेर यण्यांत.

मनव्योमिं—चित्ताच्या चिदाकाशांत हीं नादाक्षरें सततच वावरत असतात.

(६१७)

छंदरुषिदेवत—प्रत्येक मंत्राचा छंद, ऋषि व देव ठाउक असल्या शिवाय मंत्र सिद्ध होत नाहीं हा मंत्रशास्त्राचा सिद्धांत आहे व हें सारें गुरुमुखानेंच कळलें पाहिजे हा दंडक आहे.

(६१९)

उन्मेषें—उघडपणानें. मागें जसा उजेडें शब्दाचा प्रयोग केला आहे तसाच येथें उन्मेषें शब्द वापरला आहे.

बालबोधें—स्पष्टपणें व लहान मुलास समजेल अशा तऱ्हेनें. मराठीसही हा शब्द लावितात ह्मणून मराठींत असाही अर्थ येथें करितां येईल. त्यावेळचे सारेच ग्रंथकार मराठींत लिहीत असतांना या गोष्टीचा उल्लेख करीत असत. पुढेंहि ओंवी १०२३ त ही गोष्ट चांगदेवानें- हि स्पष्ट केली आहे.

(६२०)

देहगोळकोत्पत्ति—देहाच्या गोळयाची उपज. सर्व देहास ही नाडी मुख्य आधार मानिली गेल्यामुळें देहनिर्मितीसच ही कारण मानिली गेली आहे. ६०४ ओंवी मध्येंही कुंडलिनी ह्मणजेच पिंड असें ह्मटलें आहे.

(६२१)

भुजंगळणें—भुजंगपणें बद्दल चुकीनें लिहिलें असावें.

सूतलें—निजली असे. 'सूतना' या हिंदी धातूवरून 'सूतणें' या मराठी धातूचा प्रयोग केला आहे. पुढेंहि ओंवी ६५८ मध्यें 'सूतली' ह्मणजे निजलेली या अर्थी या धातूचा प्रयोग सांपडतो. 'सूतलें' हें रूप लेखकप्रमादानें झालें असावें व या लेखकप्रमादाचें कारण प्राचीन लिपींतील मात्रे प्रमाणें लिहिली जात असणारी वेलांटी असावी.

आधारिं---आधारचक्राचे ठिकाणीं. योगशास्त्रांत आपल्या शरीराच्या ठिकाणीं सहा चक्रें मानलीं आहेत. गुदद्वाराजवळील शिवणीच्या ठिकाणीं (१) आधारचक्र, नाभिप्रदेशाजवळ (२) स्वाधिष्ठानचक्र, हृदयदेशाचें ठिकाणीं (३) मणिपूरचक्र, नासामूलीं (४) अनाहतचक्र, कपाळाचें ठिकाणीं (५) विशुद्धचक्र व शिरोभागीं (६) आज्ञाचक्र अशीं हीं सहा चक्रें होत. चक्र ह्मणजे शरीरांत खोलगट असलेली वाटोळी जागा. समाधि लावतांना वायु ऊर्ध्व करून ब्रह्मांडीं नेऊं लागलें ह्मणजे या सहा चक्रांच्या ठिकाणीं तो भरून राहत असतो अशी योगाची माहिती आहे.

(६२२)

विद्यु---विद्युत्, वीज.

मछक---मत्स्य, मासा. 'त्स' चा प्रायः 'छ' होतो. 'क' हा स्वार्थी प्रत्यय आहे.

आधारि---आधारिं.

(६२३)

आधारिणी---आधारिणी, आधार असलेली किंवा आधारस्थानीं राहणारी.

(६२४)

कुळा अकुळा---कुळ शब्द हा येथें शक्तिमार्ग संप्रदायांतील अर्थी वापरला आहे. शक्ति व तिचें पूजन या अर्थी कुल शब्द येथें वापरला आहे. या पासूनच कौळ ह्मणजे वाममार्गी शाक्त असा अर्थ होतो. या शक्तीचा ह्मणजे कुंडलिनीचा विचार शाक्त व अशाक्त दोघेहि करितात.

पक्षद्वय---जीव आणि शिव या दोन्ही पक्षास.

नाडित्रया---इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन्ही नाडींस. योगशास्त्रांत या तीन नाडया मुख्य मानिल्या आहेत.

(६२५)

दशवायु---प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पांच व चलन, वलन, प्रसारण, निरोधन व आकुंचन करणारे किंवा नाग, कूर्म, कृकरा, देवदत्त व धनंजय

या पांच नांवांनीं प्रसिद्ध असलेले पांच मिळन दहा. पहा दासबोध द. १६, स. ६, ओं. ३, ४.

गुणत्रया—सत्व, रज व तम या तीन गुणांस.

पीठत्रया—पीठचया असा पाठ हवा.

शरीरसंख्या—सात. हीं सातही पीठें पश्चिम मार्गाचीं ह्मणून ज्ञानदेवांनीं आपल्या उत्तरगीतेंत पुढील प्रमाणें सांगितलीं आहेत. त्रिकुंभ किंवा त्रिकूट, श्रीहट, गोल्हाट, औट, भ्रमर, चैतन्य व ब्रह्मरंध्र हीं तीं सात पीठें होत.

(६२७)

दशविध—गुणात्मक जीव, मन, बुद्धि, चित्त, अहंकार व पंचमहाभूतें मिळून दहा प्रकारचें.

(६३०)

जन्मजाले—जन्मजले, जन्म दिले या अर्थीं जन्मजणें या धातूचें रूप असावें. ओंवी ६३२ मध्यें 'प्रसउनु' असें ह्मटलें आहे.

(६३१)

सर्वां शेषां—सर्व इतर गोष्टींत.

(६३३)

क्षितिप्ररोहो—क्षिति प्ररोहें असा पाठ असावा. जमिनी पासून वाढल्यानें.

(६३४)

केंति—किति किंवा केंवि.

विकरलें—विकारलें.

(६३५)

ईशान—या व पुढील ६३६ या ओंवीत पंचतत्वांवर स्थापिलेली पांच ईश्वर-स्वरूपें सांगितलीं आहेत. विभूति धारण मंत्रांत शिर, मुख, हृदय गुह्य व पाद या पांच ठिकाणीं आकाश, वायु, तेज, आप व पृथ्वी या पांच भूतांचें भस्म करून

ीं चर्चिण्याची कल्पना आहे. या पांच मंत्रांतील प्रथम शब्द प्रत्येक भूताचा
िपति मानला आहे. 'ईशानः सर्व विद्यानां' या मंत्रांतील ईशान, 'तत्पुरुषाय
महे या मंत्रांतील तत्पुरुष, 'अघोरेभ्यो' यांतील अघोर, 'वामदेवाय नमो' पैकीं
देव व 'सद्योजातं प्रपद्यामि' यांतील सद्योजात, हीं तीं पांच ईश्वर स्वरूपें होत.

(६३६)

अनुक्रमें—अनुक्रमें असा पाठ हवा. पुढील मात्रेमुळें 'क'वर मात्रा लिहिली
ली.

(६३९)

दीपकळिका—दिव्याची ज्योत. हा संकोच व विकास उपनिषद्ग्रंथांस प्रमाण-
त आहे. ब्रह्मवल्लींत हाच क्रम सांगितला आहे.

(६४०)

यावेगळा—याहून निराळा. रूपातीत म्हणजे सर्व प्रकारच्या रूपांत राहणारा
ण त्याहून निराळा. 'स्थिरचर व्यापुनि अवघा जो जगदात्मा दशांगुलें उरला'तो.

(६४१)

संकळौनि—संकलन करून, एकत्र करून. द्विमात्रक औकारांत रूप ध्यानांत
ठेवण्या सारखें आहे.

(६४३)

हठयोगु—योगमार्गाचा एक प्रकार. या प्रकारांत देहास दंड देऊन चित्ताची
चंचलता मोडावयाची असते.

राजयोगु—योगमार्गाचा एक दुसरा प्रकार. हा सुलभ असल्यामुळें हठयोगा-
विरुद्ध याचें नांव राजयोग आहे. यांत आसनावर बसून एकाग्र चित्तानें समाधि
साधावयाची असते.

(६४४)

वचती—जातात. संस्कृत 'व्रज्' पासून 'वच' हा प्राचीन मराठींतील धातु
झाला असावा.

(६४५)

स्थानमान—देह किती दिवस टिकणारा आहे व केवढासा आहे, हें स्थानमान. मराठी तानमान शब्द याच पासून झाला आहे.

होआवें—व्हावें.

(६४७)

सुचिल—सुविल. प्रसवील, जन्मदेईल. च व व या दोन्ही अक्षरांच्या तत्कालीन लेखन पद्धतिमुळें झालेला लेखक प्रमाद.

(६४९)

क्रेत द्वापर—कृत त्रेत द्वापर असें लिहितांना चुकून लिहिलें गेलें. हीं तीन युगें येथें सांगावयाची होतीं हें पुढील ओळींतील कलियुग शब्दावरून स्पष्टच आहे.

(६५१)

वरि—वरच्यावर, सर्वां आधीं.

शून्यध्यानिं—कशाचेंहि विशिष्ट ध्यान नसणें याचें नांव शून्यध्यान. म्हणजे शून्याचें ध्यान असा विधायक अर्थ न घेतां निषेधक अर्थच येथें घ्यावयाचा आहे.

वांचौनि—जिवंत राहून.

(६५२)

चौरंगीनाथ—नाथ परंपरेंतील एक पुरुष. याचे हातपाय तुटून पडला असतां या भग्नावयवस्थितींत मत्स्येंद्रनाथाच्या दर्शनानें यास हातपाय फुटले अशी कथा आहे. ज्ञानदेवानेंही ज्ञानेश्वरींत "तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं। भग्नावयवा चौरंगी। भेटला कीं तो सर्वांगीं। परिपूर्ण झाला॥" असा अ. १८, ओंवीं १७५४ मध्यें उल्लेख केला आहे.

(६५४)

शून्य घसणीं—शून्य घर्षणीं. हें कांहीं नाहीं, हें कांहीं नाहीं, नेति, नेति असा सारखा विचार करून.

(६५५)

पवनाभ्यासु—वायु निरोधाचा अभ्यास, प्राणायामाचा अभ्यास.

बंधु—मूळबंध, जालंधरबंध व उडियानबंध हे तीन. यांच्या विषेश विवरणा साठीं ज्ञानेश्वरींतील अ. ६ मधील १२ व १३ व्या श्लोकांवरील ओंव्या पहाव्यात.

भेद—मागें सांगितलेल्या चक्रांचा भेद.

मुद्रा—योगशास्त्रांत ध्यान करीत असतांना बोटांच्या विशिष्ट प्रकारच्या ठेवणी सांगितल्या आहेत त्या.

(६५६)

वज्रासन—एकप्रकारची मांडी घालणें. ज्ञानेश्वरी अ. ६ ओंव्या १९२ ते १९९ मध्यें मूळबंध व वज्रासना ची माहिती देऊन 'अर्जुना हें जाण, मूळबंधाचें लक्षण, वज्रासन गौण, नाम यासी' असें सांगितलें आहे.

निगतु—निघणारा.

भरितु कीजे—भरावा. अपान द्वारानें बाहेर पडणारा वायु उलटा करून शरीरांत भरावा.

(६५७)

अधें—खालून.

ऊर्धें—ऊर्ध्वचें अपभ्रष्ट रूप. खालून अडविला व वरून दाबला म्हणजे मध्यें भरणारा वायु आकुंचन करावा लागतो व या प्रमाणें आकुंचित झाला कीं तो उसळू लागतो.

अंकुचिजे—आकुंचिजे.

(६५८)

सूतली प्रबोधें—प्रबोधे असे निरनुस्वार क्रियापद रूप वाचावें. निजलेली जागी होई.

(६६०)

आविंस—आमिष, भक्ष्य.

ग्रासिती—खाऊं लागली. तीन्ही चरणांतील क्रियांचा चालूं लागली, पेलूं लागली, व ग्रासूं लागली असा अर्थ केला पाहिजे.

(६६१)

मुंकली—मुकली. संस्कृत 'मुञ्च्' वरून अनुस्वार आला.

सत्राविं—सतरावी. चंद्राच्या कळा सोळा आहेत. यांहून निराळी ही सतरावी कला योगमार्गांतली एक संज्ञा आहे. योगशास्त्राची कल्पना आहे कीं नासामूल व दृष्टीच्यावर एक अमृतानें भरलेली नाडी आहे. कुंडलिनी जागृत होऊन तिनें शरीरांतले सारे दोष जाळून टाकले व प्रबुद्ध होऊन ती ब्रह्मांडीं जाऊं लागली ह्मणजे तिच्या धक्क्यानें ही ऊर्ध्वमुख नाडी अधोमुख होते व तिच्यांतून अमृत स्रवूं लागतें. ज्ञानेश्वरांनीं इलाच 'चंद्रामृताचें तळें' ह्मटलें आहे.

श्रवलि—स्रवलि, स्रवूं लागली.

(६६३)

ग्रंथित्रय—इडा, पिंगला व सुषुम्ना यांच्या गांठी.

(६६६)

नोबलें—बोलत नाहीं. न बोले याचें रूप. जुन्या मराठींत निषेधार्थी धातु करावयाची ही तऱ्हा दिसते. 'न' हा निषेधार्थी शब्द घेऊन त्या पुढील धातूच्या आद्याक्षराचा स्वर 'न'स लावावयाचा व तें आद्याक्षर अकारांत ठेवावयाचें असा नियम दिसतो. न बोलणें, याचें नोबलणें, न देखणें, याचें नेदखणें, न घेणें चें नेघणें इत्यादि उदाहरणें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत.

पाहिलें—येथें तीनच अक्षराचा एक चरण आहे. ज्ञानेश्वरांनी ओंवीच्या प्रथम तीन चरणांत पांच अक्षरांहून कमी अक्षरें कधींच वापरलीं नाहींत, पण चांगदेवानें त्र्यक्षरी चरणही क्वचित् वापरला आहे.

(६६७)

आनानीं—अन्यान्यीं, निरनिराळ्या. अन्य चें अन्न होऊन आन झालें आहे.

(६६८)

पांति—पंक्ति, ओळ.

(६७०)

कें—कोठें, कोठलें.

शृष्टि—सृष्टि.

उठी—उठणें, उत्थान. ईकारांत भाववाचक नामें जुन्या मराठींत पुष्कळच आढळतात. उजिरी, लिही, घडी (घडण) इत्यादि उदाहरणें दाखवितां येतील.

(६७१)

कसण—आधार, कणा.

(६७३)

पांगुळ—निराधार.

(६७६)

सगर्भा—साऱ्याच्या साऱ्या, आंतील भागा सहित.

(६७७)

वेटेश्वरू—वटेश्वरु.

तस्य—संस्कृत रूप जसेंच्या तसेंच. ओं. ६०७ पहा.

उन्मळीला—उन्मूलन केला, उपटून टाकिला, नाहींसा केला.

(६७८)

उपसिले—उपदेसिलें. लेखकप्रमादानें मधील 'दे' हें अक्षर लिहावयाचें राहिलें.

(६८०)

नेदिल—न देईल. न देणें, 'नेदणें' चें रूप.

(६८२)

नांतरी—ना तरी.

ऐली थडीयें—इकडील तीरावर.

प्रयत्नु—प्रयत्नें.

पैलु पारु—पलीकडील तीर. ज्ञानदेवाच्या उत्तर गीतेंत हीच कल्पना जवळ जवळ याच शब्दांत सांगितली आहे. 'तंवचि पांगु कीजे नावेचा, जंव्रवरि पारु न पाविजे महा नदीचा, तो पावलिया नावेचा, अनादरु कीं.'

(६८५)

कव्हणी येकी काळवशां पतित—कोणी एक आकस्मिक पडलेली. हें पुढील चरणांतील दोरीचें विशेषण.

जालेयां—झाल्यास, झाल्यावर.

(६८७)

विव्हावो—विवाह. 'ह'अंतीं असल्यामुळें ओकारांत रूप होऊन वर्णव्यत्यासानें झालेलें रूप.

चेइलेयां—जागे झाल्यावर. चेतणें पासून चेइणें.

(६९०)

आधार—आधारचक्र व त्याचें ज्ञान. येथें साही चक्रांचीं नांवें सागितलीं आहेत.

(६९१)

अनहात श्रवण—अनाहत श्रवण. समाधि लागल्यावर कर्णपथावर जो एक प्रकारचा नाद ऐकूं येत असतो तो ऐकणें. हा कशावरहि आघात न करितां होत असल्यामुळें यास अनाहत नाद असें ह्मणतात.

(६९२)

अवस्थात्रय—जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन स्थिति.

(६९४)

धातुर्वाद—किमया. सोनें करण्याची विद्या.

विवर—निरनिराळी काढ. या चरणांत १६ अक्षरें आहेत.

झणें—नको. 'चन' या संस्कृत शब्दां पासून हा मराठी शब्द झाला असल्यानें हा निषेधार्थी वापरलेला असतो.

(६९५)

नीरोपद्रवस्थानीं रहण—निरुपद्रवस्थानीं राहणें.

(६९७)

आरिख—संस्कृत 'आर्ष' पासून आर्खं, आरिख असें झालें आहे. जुनें व ह्मणूनच सोन्या सारखें असलेलें सत्य.

(६९८)

यता—इयत्तेनें, मर्यादेनें. कल्पना अशी आहे कीं सर्वांचा काळ मर्यादित आहे. माणसें मेल्यावर देव होतील, देवांचें आयुष्य संपल्यावर इंद्रादि देव ब्रह्मरूप होतील, ब्रह्मा आपल्या मर्यादेचे शेवटीं विष्णुमूर्तींत लीन होईल.

(६९९)

व्यरवस्ते—व्यवस्ते ऐवजीं हीं अक्षरें लिहिलीं गेलीं असावीत. 'व्य' नंतर 'स्ते' चा सकार भाग जो रकारा सारखा असतो तो काढला गेला. पण लगेच चूक लक्षांत आल्यानें व लिहिला पण मागील रकार खोडावयाचा राहिला. ओं ९ तील महिमाग्नें वरील टीप पहा. व्यवस्ते हा शब्द पुढेंहि ७१५ व्या ओंवींत आला आहे. संस्कृत 'व्यवसित' यांतील धातूचें हें रूप आहे. लीन होई, शेवटीं होई.

(७००)

सूरदेहस्थिति—सुरदेहस्थिति.

(७०१)

अंतःष्करण—अंतःकरण. जुन्या जिव्हामूलीय उच्चारामुळें लेखकप्रमाद.

(७०२)

होए—होई, होय.

(७०४)

कडवसा—लेप, बंध.

(७०५)

अविलिल—अशुद्ध. संस्कृत 'आविल' पासून झाला असावा.

(७०६)

थोकडिं—थोडीशीं, लहानशीं. संस्कृत 'स्तोक' पासून हा शब्द झाला व मग वर्णव्यत्यासानें थोडकीं होऊन थोडीं अशा रूपानें हाच शब्द आजच्या मराठींत वावरत आहे.

(७०९)

उरैल—बाकी राहील. पंचतत्वें पंचतत्वांत मिसळल्यावर जें शिल्लक उरेल.

(७११)

शून्यगर्भु—ज्याच्या आंत कांहीं नाहीं असा.

(७१२)

तुसे—तुज ऐसे, तुजसे.

(७१४)

मन पवन—वाऱ्यासारखें चंचल असणारें मन. तुकारामानेंही हा शब्द 'जेथ पांगुळलें मन पवन' येथें असाचा असाच वापरला आहे.

शून्नीं—शून्यीं. उच्चारदोषामुळें लेखनदोष. 'न्य' चा उच्चार 'न्न' सारखा बहुधा ऐकूं येतो.

आथि—'अस्ति' चें रूप आहे. हें प्रश्नार्थक वाक्य समजलें पाहिजे.

(७१६)

फुडें—स्फुटपणानें, स्पष्टपणानें.

(७१७)

राणीवीं—रहाणीवीं, अस्तित्वांत. रहाणें या पासून रहाणीव होऊन राणीव शब्द होतो.

(७२१)

निराळंभ—निराधार, निरालंबन

शृति—श्रुति.

(७२४)

अनामय—कल्याण.

(७२५)

युगांत शेष—युगांतींही शिल्लक राहणारें.

(७२८)

विसवले—विसांवले. 'विश्राम' पासून विसांवा व त्या पासून झालेला विसांवणें हा धातु.

(७३०)

भांगार—संस्कृत 'भृंगार' ह्मणजें सोनें या पासून हा शब्द झाला असावा. ज्ञानेश्वरकालीं हा शब्द फार प्रचारांत होता.

भाव भजति—निरनिराळीं रूपें घेतें.

तिं—ती.

(७३१)

तुंचिये—तुझ्यांत.

उपचार—सामग्री, सर्व गोष्टी. तुझ्या साऱ्या गोष्टी तुझ्यांतच सामावलेल्या आहेत.

(७३३)

मनांचां—मनाच्या.

रिगौनियां—रिघून, प्रवेश करून.

(७३४)

सांडित्येनसि—सोडणाऱ्यासह. या ओंवींत चांमदेवानें वस्तुवर्णन करितांना शब्द कसे पांगुळतात हें सुरस रीतिनें दाखविलें आहे. मनांत शिरून विचार केलास तर तूंच तूं आहेसा दिसशील असें सांगितलें खरें. पण मनांत शिर ह्मणता बरोबर शिरणारा व शिरण्याची क्रिया आणि शिरण्याचें ठिकाण या तीन गोष्टी भिन्न वाटतात. ह्मणून पुढें सांगितलें कीं रिघालेंपण ह्मणजे आंत शिरण्याच्या

क्रियेस खरें समजूं नको. तें रिघणें ह्मणजें रिघणें नव्हे. पण हा निषेधभाव कांहीं तरी अस्तित्व सुचवितो ह्मणून तो सोडावयास सांगावें तों पुन्हां सोडणारा, सोडण्याची क्रिया व सोडावयाची वस्तु ही त्रिपुटी कायमच रहाणार. ह्मणून तो निषेध सोडणाऱ्यासह सोडावयास सांगितला. सारांश पुढील ओंवींत सांगितल्या प्रमाणें या वर्णनांत शब्दच खुंटतात ह्मणजे कुंठित होतात.

(७३७)

सामावणी—ईकारांत भाववाचक नाम. लीनता, लय.

(७३८)

आणपांचि—आपणपांचि. 'प' लिहितांना चुकून राहिला.

(७४०)

तुजावांचौ निरंतरि—तुझ्या वांचोनि निरंतरी.

(७४६)

वोळगिजे—नमस्कार करावा. मूळ संस्कृतधातु 'अवलग्.' अव चा झाला वो व ल चा झाला ळ. तुकारामही ह्मणतो 'ब्रह्मादिक जेथें तुह्मां वोळगणे, इतर तुळणे काय पुरे.'

न्हवण—स्नपन पासून झालेलें रूप. स्नान घालणें.

आपणेयां—आपल्यास. तुकारामा पुढें 'मनें प्रतिमा स्थापिली, मनें मना पूजा केली, मनें इच्छा पुरविली, मन माउली सकळांची ।। मन गुरु आणि शिष्य, करी आपुलेंचि दास्य, प्रसन्न आप आपणांस, गति अथवा अधोगति.।।' हें लिहितांना या ओंव्या असाव्यातसें वाटतें.

(७४७)

वाइजे—वाहिजे.

(७४८)

मुंगियेच्यां ठाउनु ब्रह्मावरि—मुंगीच्या सूक्ष्म ठिकाणा पासून ब्रह्मा पावेतों.

(७५०)

परौतें—पलीकडील, श्रेष्ठ, उंच.

खालौतें—खालील, नीच.

(७५१)

निघोट्—निर्भेळ.

तत्वसार—'तत्व' याचें सार. 'तत्वमसि' या महावाक्यांतील ग्राह्य अर्थ. याच अर्थानें हा 'तत्वसार' ग्रंथ असावा असें वाटतें. चांगदेवांस ज्ञानदेवांनी जें पांसष्ट ओंव्यांचें पत्र लिहिलें व जें चांगदेव पांसष्टी या नांवानें प्रसिद्ध आहे, त्यांत 'तत्वमसि' या महावाक्याचाच बोध लिहिला आहे. तेव्हां हा बोध झाल्यानंतर या 'तत्वमसि' महावाक्याचें सार चांगदेवाच्या ग्रंथांत येणें साहजिक आहे.

पैं—पाहीं. याचें 'पाइं' असें होऊन त्याचेंच रूपांतर 'पैं' असें झालें आहे.

(७५४)

मनाहिं—मन नाहिं. एक नकार लेखकदोषामुळें राहिला. ही ओंवी वाचली कीं केनोपनिषदांतील 'यदि मन्यसे सुवेदेति' ह्मणजे 'समजलें वाटणारांस समजलें नसतें' या मंत्राची आठवण येते.

(७५५)

या ओंवीचा स्पष्ट अर्थ समजला नाहीं.

(७५८)

माहाशून्य—महाशून्य. मन विचार करतां करतां हारलें आणि माझ्या शिवाय कांहीं नाहीं हें समजलें ह्मणजें शून्य ज्ञान झालें. पण हा बाकी उरलेला मीपणाही नाहींसा झाला ह्मणजे जें काय उरलें तें महाशून्य. 'मी ब्रह्म आहे' हें समजून माझ्या मी पणाचा लोप झाला ह्मणजेच खरें ज्ञान आलें.

(७६२)

सिंपे—'लिंपे' असा पाठ हवा.

वासिपे—'वाश्' ओरडणें या पासून वास, वासिप हा धातु झाला. याचा अर्थ ओरडणें, मोठ्यानें सांगणें.

(७६४)

भांगारें—सुवर्णालंकार. या चरणांत १७ अक्षरें आहेत.

पाए न व्हाती—आधार होत नाहींत. पाया ह्मणजे आधार व व्हाती ह्मणजे होती.

(७७०)

सूतला—निजला. ओं. ६५८ पहा.

आपुलांचि—स्वतःच.

(७७३)

अनुचित्तें—अनुचितें. खरें पाहिलें असतां बहुवचन 'कर्में' असें पाहिजे. पण येथें विशेषणाचें बहुवचन व विशेष्याचें एकवचन लेखणीच्या घसरण्यानें झालें असावें.

न बंधिजसि—बद्ध होणार नाहींस, बांधिला जाणार नाहींस.

(७७५)

ध्वनित—मनांतील गोष्ट.

(७७७)

शिष्येंचि—'शिष्याचें' असा पाठ हवा.

(७७९)

घरोपरि—हा शब्द बहुधा 'परोपरी' असावा. परोपरी ह्मणजे प्रकार. 'प' च्या ऐवजीं चुकून 'घ' झाला असावा.

(७८२)

पाहालें—पाहिलें. जिहीं हा कर्ता अध्याहृत आहे.

आंधारें—दृष्टीचा संशय. स्पष्ट न दिसणें. आज हाच शब्द 'आंधारी' या रूपांत वावरत आहे.

(७८३)

तोकरूपां—लहान मुलाच्या रूपानें वावरणाऱ्या जीवात्म्यास.

दोशशृष्टी—'दोषसृष्टि' हें शुद्ध रूप. लोकांस दोष ह्मणून दिसणाऱ्या गोष्टी.

परि—हें येथें उपमावाचक अव्यय आहे. याचा संबंध मागील चरणांतील दोषसृष्टीशीं आहे. ज्या प्रमाणें लहान मुलाच्या रूपानें वावरणाऱ्या जीवात्म्यास लोकांस वाईट दिसणाऱ्या गोष्टी बाधत नाहींत; ह्मणजे त्याचे हातून अशा गोष्टी झाल्या तरी त्यास दोष लागत नाहीं, त्याच प्रमाणें ज्ञान दृष्टि प्राप्त झालेल्या माणसासही उचितानुचित कर्माचें बंधन राहत नाहीं.

(७८५)

तो त्या पापपुण्यसन्मंधु—'तो पापपुण्यसंबंध त्याला' असा अन्वय करून पुढील 'कदाचि नाहीं' शीं जोडावयाचा.

(७८६)

सुनिटलें—'निसुटलें' असा पाठ हवा. लेखकाच्या चुकीमुळें हा वर्णव्यत्यास झाला असावा. निसुटलें ह्मणजे निघून गेलें.

(७९१)

मनमुक्तु—मनाच्या तडाक्यांतून मुक्त झालेला. अमुक करावें व अमुक करूं नये अशी ज्याच्या मनांत प्रवृत्ति राहिली नाहीं तो.

(७९३)

कृताकृत्य—'कृतकृत्य' असा पाठ हवा.

(७९७)

जालां—झालों. हें उत्तमपुरुष वाचक एकवचनीं रूप ध्यानांत ठेवण्या सारखें आहे. या ग्रंथांत बरेच ठिकाणीं अशा प्रकारचें रूप आलें आहे.

(८००)

केलां—केलों. येथें पुढें 'मिं' हें उत्तमपुरुषीं सर्वनाम असल्यानें या रूपाबद्दल संशयच नाहीं.

सांघिजो—सांगावें. जुन्या मराठींत द्वितीय पुरुषीं बहुवचनीं असें रूप नेहमीं येतें. ज्ञानेश्वरीच्या आरंभींच 'म्हणे निवृत्ति दास, अवधारिजो जी' असें आहे.

(८०५)

आंगावरि—निवळ स्वतःच्या जवाबदारीवर, कोणास जामीन न ठेवतां.

(८०६)

अप्रचेया—अप्रचेतया असा पाठ पाहिजे. प्रचेता ह्मणजे ज्ञानी व अप्रचेता ह्मणजे अज्ञानी.

(८०९)

गुर्विणी—गर्भिणी.

(८१२)

कीर—निश्चित. 'संस्कृत 'किल' पासून हा शब्द 'ल' चा 'र' होऊन झाला असावा.

(८१३)

गुरुनु—गुरूनें. तृतीयेच्या एकवचनाचें रूप.

(८१८)

कर्मफळथार—कर्मफळास थारा. थारा ह्मणजे राहण्यास जागा.

(८१९)

मना—'मन' असा पाठ हवा. मन अनुभवा पलीकडे आहे. आणि अंतः-करणांत ज्ञानप्रकाश असेल तर कर्माचें फळ राहण्यासच असमर्थ होईल. कर्मफळेच्छाच नसल्यास कर्मफळ कसें यावयाचें.

कर्मगर्भु—कर्माचें बीज.

(८२०)

रुसणेंनसि—रुसणाऱ्यासह. मागें ओंवी ७३४ पहा.

(८२२)

येकु येकु—एकदांच येकु पाहिजे. लेखक प्रमादामुळें द्विरुक्ति.

अन्यासि—'अनायासिं' असा पाठ पाहिजे. कांहीं श्रम न करितां. पुढें ओंवी ८२५ मध्यें स्पष्टच 'अनायासें' असें पद आलें आहे.

(८२४)

पशुपाश—हा शब्द अत्यंत अप्रयुक्त पण फार महत्वाचा आहे. ज्या दोरीनें पशु वधस्तंभास बांधला जातो तो पशुपाश. पण कृष्णमिश्राच्या प्रबोधचंद्रोदय नांवांच्या नाटकांत हा शब्द एका विशिष्ट अर्थी वापरला आहे. जीवात्म्यास जखडून टाकणाऱ्या बंधनांस हा शब्द कृष्णमिश्राने वापरला आहे. या अर्थी हा शब्द फक्त याच नाटकांत आला आहे. कृष्णमिश्राचा काल ई. स. च्या अकराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं आहे. या नाटकांत प्रथमच वेदान्त व वैष्णव भक्तीची सुंदर सांगड घातली आहे. चांगदेवानें हा ग्रंथ वाचला असावा असें दिसतें. पुढचा 'च' शब्द 'प्रबोधतां' ही हेंच सुचवितो.

(८२६)

अवलिला—लीलेनें, सहज. अवलीला हें शुद्ध रूप.

(८३०)

परब्रह्मोआ—परब्रह्माचें योगानें. तृतीयेचें एकवचन.

(८३२)

जि—जी, सन्मानार्थी संबोधन. हें संस्कृत 'अयि' चें रूप. य चा झाला ज व अ चा झाला लोप. अजी, जी, दोन्हीं रूपें प्रचारांत आहेत व दोन्हींचा मिळून झालेला 'अजीजी' शब्दही मोठ्या माणसाचा कल पाहून बोलणें या अर्थी रूढ आहे.

गुरुनिवारिला—'गुरुनि वारिला' असा पदच्छेद करावा. गुरूनें निवारण केलें.

(८३४)

त्रुप्ति—शुद्ध रूप तृप्ति.

(८३५)

आर्हंता—योग्यता. अर्हत् या शब्दापासून झालेलें भाववाचक नाम. पुढच्याच ओंवीत हेंच रूप निरनुस्वार आलें आहे.

(८३७)

संघावें—सांघावें बद्दल लेखक प्रमादानें लिहिलें गेलेलें रूप. अधिकार-हीन माणसास ज्ञान न सांगण्याचा योग्य प्रघात भारतवर्षांत फार प्राचीन काळा-

पासून चालत आला आहे. 'इदमशिष्याय न देयं' ही सूचना उपनिषदांत वेळोवेळीं दिलेली आहे. मनूनेंहि असेंच सांगितलें आहे कीं.

विद्या ब्राह्मणमेत्याह शेवधिस्तेऽस्मि रक्ष माम्।
असूयकाय मां मा दा यतः स्यां वीर्यवत्तमा ॥

हव्या त्या माणसास हवें तें ज्ञान दिल्यानें अर्था ऐवजीं अनर्थच होतो. हा अनर्थ ह्मणजेच सृष्टिघात पुढील चरणांत सांगितला आहे. पुढील ओंव्यांतून ह्माच अर्थ अधिक स्पष्ट केला आहे.

(८४२)

विषयसुषे—विषय सुखें. ख बद्दल ष जुन्या ग्रंथांतून पुष्कळ ठिकाणीं सांपडतो. याचें कारण ह्मणजे नर्मदेच्या उत्तरेस ष चा ख च उच्चार करितात. ष चा ख, य चा ज व ज्ञ चा ग्य असा उच्चार शुक्ल यजुःशाखीय वैदिकलोकांतही प्रचलित आहे.

चोचावले—हा शब्द चोंच या नामा पासून झाला आहे. पक्षी मुळांस चोंच मारून जशी भोंकें पाडतात तसें करणें ह्मणजे चोचावणें. मोरांबा, मोरावळा करितांना आंब्यांच्या फोडीस किंवा आंवळ्यांसही चोंचावीत असतात. याच प्रमाणें भिन्न भिन्न संशयांनी चोचावलेले ह्मणजे विद्ध झालेले. अशा प्रकारचें व्यंजक शब्द मराठींत किती तरी आहेत.

(८४३)

विचंबलें—'विटंबले' असें असावेंसें वाटतें.

(८४६)

इछेच्या पावतीं, योगातें ते—ते इच्छेच्या योगातें पावती, असा अन्वय. जो योग पूर्वीं इच्छित होते तो त्यांस मिळूं लागतो.

(८४८)

देवत्रयचिन्हें—हा शब्द असाच घेतला तर त्याचा अर्थ तीन्ही देवांचीं ह्मणजे ब्रह्मा, विष्णु, महेश यांचीं लक्षणें असा अर्थ होईल. पण हा अर्थ समाधानकारक

वाटत नाहीं. कदाचित् 'देवत्वचिन्हें' असा पाठ असेल व तसा असल्यास यश, श्री, कीर्ति इत्यादि लक्षणें असा चांगला अर्थ होऊं शकेल.

(८४९)

घेपिजे—घेपणें ह्मणजे आपल्या ताब्यांत घेतलें जाणें. घेणें या धातू पासून घेपणें हा शब्द झाला आहे.

(८५०)

विधि—हा शब्द चुकीनें पडलेला दिसतो. पुढील ओंवी वरून हा शब्द विघ्न असावा असें वाटते. आज जरी मराठींत विघ्न शब्द नपुंसकलिंगीं आहे तरी स्वप्न शब्दा प्रमाणें पूर्वी तो पुंल्लिंगीं व नपुंसकलिंगीं असा दोन्ही लिंगीं असणें शक्य आहे. किंवा चांगदेवाच्या यमक=निरंकुशत्वास अनुसरून 'तया तत्वज्ञा विघ्नें काइसी' असाही पाठ संभवनीय आहे.

(८५१)

त्ये—ते.

(८५२)

चाडा—चाडेनें, इच्छेनें.

धाडा पडला—घाला पडला. घाला या अर्थी धाडा हा शब्द अजूनही रूढ आहे.

(८५३)

देवाच्या आंगि—देवांच्या आंगीं. देवांच्या देहास आग लागते ह्मणजे ते क्रोधाग्नीनें जळू लागतात.

(८५४)

उजिरि—किरण, झांक, प्रभा. संस्कृत 'उज्ज्वल्' या धातू पासून हा शब्द झाला आहे. हें इकारांत भाववाचक नाम.

कुदळिघात वरि आरोढिलें—वर कुऱ्हाडीचे घाव घालणें सुरूं केलें.

(८५५)

केसणें—कशानें. कैसेनि पासून हें रूप.

(८५६)

खापर सादृश्य—खापरासारिखें.

फेडी—'फोडी' असा पाठ हवा.

(८५७)

लोष्टकपालि—अर्थ लागत नाहीं. ही सारीच ओंवी स्पष्ट कळत नाहीं.

इद्—'इंद्र' असा पाठ असावासें वाटतें.

(८६०)

श्रीगुरुचेया—श्रीगुरूच्या.

(८६४)

मूखिचा—मुखींचा.

उगाळू—घांस. संस्कृत 'उद्गार' पासून झालेला शब्द.

(८६९)

आचार्ये—शेवटल्या य मुळें हें एकारांत रूप झालें. शेवटीं व असता तर ओकारांत रूप होतें जसें राव चें रावो. पण रायचें होतें राये.

(८७०)

श्रीमुक्तादेवी योगिनी—या परंपरेंत निवृत्ति व ज्ञानदेव यांचीं नांवें नसून गोरक्षनाथा नंतर मुक्ताबाईचाच योगिनी ह्मणून उल्लेख केला आहे. शिवकल्याण स्वामींनीं आपल्या नित्यानंद दीपिकेच्या शेवटींही अशीच परंपरा दिली आहे. गोरक्षनाथा पासून एक प्रवाह गैनीनाथ, निवृत्ति व ज्ञानदेव या मार्गें आला व दुसरा मुक्ताबाई, वटेश्वर, चांगदेव या मार्गानें आला.

चक्रपाणि—हा वटेश्वराचा शिष्य ह्मणून चांगदेवाचा समकालीन 'वटेश्वराहुनि चक्रपाणि, लाधले हे अमृतसंजीवनी' असें शिवकल्याणस्वामी ह्मणतात.

(८७१-८८१)

या ओंव्यांत या सिद्धयोगमार्गींतील सिद्ध पुरुषांची व स्त्रियांचीं नांवें दिलेलीं आहेत. या पैकीं कांहीं नांवें हठयोगप्रदीपिकेंतही सांपडतात. (उपोद्घात पहा) या नांवावरून त्याकाळीं हा मार्ग किती व कसा पसरला होता याची कल्पना

चांगली येते. यांत अनेक जातीच्या स्त्रीपुरुषांचीं नांवें आलीं आहेत. ८८१च्या ओंवी नंतर ९१२ पावेतोंच्या ओंव्या असलेलीं दोन पत्रें किंवा ४ पृष्ठें गहाळलीं आहेत.

(९१४)

दशीं—'देशीं' असा पाठ पाहिजे.

(९१७)

गुरुसेवो—गुरुसेवे असें असावेंसें वाटतें.

शिवोऽस्मि—'अहं ब्रह्मास्मि' या वाक्याबद्दल 'शिवोहमस्मि' अशा वाक्याचा उपयोग आचार्यांनीं सुरू केला. मी शिव आहे हा बोध.

(९१९)

आपणप्येनि—आपलेपणानें. 'गुरुसेवाबळें, जें अटक ऐसें आपणप्येनि फळलें' हा अन्वय. अटक—अप्राप्य, न मिळण्या सारखें; तेंही गुरुसेवेच्या सामर्थ्यामुळें आपण होऊनच प्राप्त झालें, हा भावार्थ.

(९२२)

तियें—तीं आसनें व भुवनें.

(९२३)

वाइजती—वाहाव्यात. खरा शब्दार्थ—वाहिल्या जाव्यात.

(९२४)

निरययोनिमाझारि—निरययोनि मध्यंतरी ह्मणजे नरकयोनींत. मध्यांतरीं चें मज्झात्रीं असें रूप होऊन माझारि असें रूप झालें आहे.

(९२६)

अघोरि—भयंकर अशा. या पदावरून मागील दोन चरण 'गुरुवचन मनिं न धरी'; 'गुरुसि अहंकार करी' असे एक वचनीं असावेतसें वाटतें.

(९२७)

विसुरे—विसरे. विस्मरणें पासून विसुरणें व मग विसरणें.

(९२८)

विविधु—विधिरहित. ज्ञानी पुरुष विधिनिषेधरहित असतो हा संबंध.

समंधु—संबंध.

(९२९)

रोगिया—रोगी, रोगयुक्त.

(९३२)

खाए—हा खाणें या धातूचा प्रयोग सेवन करणें या अर्थी आहे. निंदा, पैशून्य खाणें ह्मणजे निंदा व चहाडी ऐकणें. अजूनहि शिव्या खाणें या प्रयोगांत खाणें या धातूचा उपयोग आहे.

वस्तु करुनु—ब्रह्म असूनहि, ब्रह्मप्राप्ति करूनहि.

(९३३)

पुश्चळीकें—पुंश्चली ह्मणजे शिनळ, जारिणी स्त्री. तिच्या तऱ्हेनें ह्मणजे एक सोडून दुसऱ्याचें सेवन करण्याच्या पद्धतीनें. चांगदेवाच्या अभंगांतही हा शब्द सांपडतो. 'पतिव्रते पुंश्चली सांगात झाला, दोहीतें भेटला एक देखा'. चां. अ. सं. १९.

(९३४)

येकुरु—येकुगुरु या ऐवजीं लेखकप्रमादानें 'गु' गळून राहिलेलें रूप.

(९३५)

सांडोवे—त्याग. सांडणें या धातू पासून झालेलें नाम.

(९४३)

चिखिमिखि—चोखांदळपणा. ओरडा आरड. 'चीखना' या हिन्दी धातू-पासून हें रूप झालें असावें सें वाटतें.

उपाओ—उपाय. य चा झाला व व मग झालें हें रूप.

(९४४)

त्रिशुद्धी—पूर्णपणानें, शुद्ध मनानें. या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारानें

होंऊं शकेल. वैदिक भाषेंतही तीन प्रकारचें म्हणजे मानसिक, वाचिक, व कायिक असें तीन प्रकारचें सत्य सांगितलें आहे. त्यासच अनुसरून मनानें, वाणीनें व कृतीनें शुद्ध राहून असा अर्थ करतां येईल किंवा कोणचीहि गोष्ट त्रिवार सांगितली म्हणजे पक्की झाली असा प्राचीन प्रघात असल्यामुळें त्रिशद्धीं या रूपाचें त्रिशुद्धी असें रूप झालें असावें.

(९४६)

देवंगत—'दिवंगत' असा पाठ असावा व प्राचीन लेखन पद्धतिमुळें तो 'देवंगत' असा लेखकानें वाचला असावा.

दिपांतरा—द्वीपांतरा असें पाहिजे. दुसऱ्या ठिकाणीं.

(९४८)

कराडिसी—कठिण जागेंत.

(९५०)

सदेउ—सदैव, दैववान. मागील ओंवीतल्याच 'निर्दैवें मनि शुद्ध नव्हती' याशीं विरोध दाखविण्यासाठीं वापरलेला शब्द. पुढेंहि ओंवी ९५३ मध्यें सदैव शब्द आलाच आहे.

कोलि—कोळी. एकलव्य नांवाचा निषाद. द्रोणाचार्यानें व्याधपुत्र म्हणून यास विद्या शिकविण्याचें नाकारल्यावर यानें द्रोणाचार्यांची मृण्मयमूर्ति करून तिच्या जवळ विद्या शिकल्याची कथा महाभारतांत प्रसिद्ध आहे. गुरु मातीचा असतांनाहि शिष्य आपल्या भक्तीमुळेंच आपला उद्धार करूं शकतो हें दाखविण्या-साठीं हें ठरीव उदाहरण आहे.

मातियेचा द्रोणु—मातीची द्रोणाचार्यांची मूर्ती.

(९५१)

निधान—निधन, मृत्यु. लेखकाकडून काना चुकीनें जास्त लिहिला गेला.

(९५२)

तत्पुरुषु—'सत्पुरुषु' असा पाठ हवा.

जुगां---जगां किंवा युगां. जे जाणाऱ्या जगांस स्थिर करितात किंवा जाणाऱ्या युगांस स्थिर करितात. दुसरा अर्थ अधिक चांगला वाटतो. हिंदींत युगास 'जुग' ह्मणतात 'जुगजुग जीओ' ह्मणजे युगेंची युगें जिवंत रहा. हा आशीर्वाद हिंदींत प्रसिद्ध आहे. सत्पुरुष जाणाऱ्या कालासही स्थिर करतात हा अभिप्राय.

(९५५)

अप्रमादु---प्रमादु असा पाठ हवा.

तेयाचें ज्यालें वाढे---त्याचे ठिकाणीं उत्पन्न झालेल्या गोष्टी वृद्धिंगत होतात.

जिवे तें पुढें तया ठाके---वृद्धिंगत झालेलें वा उत्पन्न झालेलें त्या पुढें येऊन उभें राहतें. ज्यालें व जिवे हीं दोन्ही रूपें जिणें ह्मणजे उत्पन्न होणें वा जिवंत राहणें या धातू पासून झालीं आहेत.

(९५६)

अवज्ञानेदखिजे---अवज्ञानें न देखिजे किंवा अवज्ञा नेदखिजे असा पदच्छेद करावा. पहिल्या अर्थात 'न' राहिला असें समजावे व दुसऱ्या अर्थात अवज्ञा हें तृतीयेचें रूप व नेदखिजे हें न देखणें पासून झालेल्या नेदखणें क्रियापदाचें रूप.

(९५८)

अर्धकूपीं---विहिरींत अर्धा व अर्धा बाहेर असा लोंबकळत.

(९६०)

ब्रह्माकोटिमध्यस्तु---'ब्रह्माण्डकोटिमध्यस्थु' असा पाठ हवा.

(९६१)

आगि---आंगिं, अंगास.

(९६५)

उपसारा---'उपचारा' असा पाठ पाहिजे.

(९६६-९९२)

या ओंव्यांचें पत्र गहाळ झालें आहे.

(९९६)

अळुमाळु—एवढेंसें, 'अडुमाडु' या कानडी रूपापासून ड चा ळ होऊन हें रूप झालें.

शिउ—शिव.

चतुष्टय—मन, बुद्धि, चित्त व अहंकार या चार गोष्टी. पहा ओवी ६२९.

(१०००)

शषासि—'शेषासि', असा पाठ हवा.

(१००३)

लिहि—इकारांत नाम. लिहिणें हा अर्थ.

(१००५)

बोहरी—निरास. अवहरणे याचे जागीं वोहरणें रूप होऊन त्याचें इकारांत नाम वोहरी. व व ब च्या अभेदानें बोहरी असें रूप होतें.

निदसुरी—पूर्णपणानें. न दुसरी याचेंच बोलींत झालेंले रूप. दुसरें कांहीं न राहतां या अर्थी हा शब्द वापरला जातो.

(१००९)

जालेपणें—स्वयं ब्रह्म झाल्याच्या योगानें. जाहलेपणें बद्दल जालेपणें असा शब्द वापरला जातो.

(१०१३)

चंद्रबिंबि—चंद्राचें मंडल उगवलें असतां.

(१०१४)

मीनला—मिळाला, एकरूप झाला.

(१०१७)

येकवाटलें—एकवटलें. एकवट ह्मणजे एकरूप. हा वट प्रत्यय घन, तिक्त, क्षार इत्यादि शब्दांत लागूनच घणवट, तिखट, खारट इत्यादि शब्द झाले आहेत. वट प्रत्ययही संस्कृत 'वत्' चाच अपभ्रंश आहे. कटवत्-कडुवट-कडवट-कटु-स्वरूप.

(१०१९)

रूप करूं—वर्णन करतां. निरूपण या अर्थीच रूप.

(१०२२)

ते कर्ष्टि समाप्ति पावविली—त्यांनीं कष्टांच्या ठिकाणीं शेवट पोंचविला असा प्रतिशब्दार्थ. त्यांनीं 'पुनरपिजननं, पुनरपि मरणं' या त्रासाचा शेवट केला, या आपत्तींतून मुक्त झाले असा भावार्थ.

(१०२७)

पृथज्ञ—'पृथक्' असा पाठ हवा.

(१०२८)

चौतिसें बारा—'अंकानां वामतो गतिः' या न्यायानें १२३४ हा शक. एकोत्रींत अजूनही हीच पद्धति सांपडते. छत्तीस छत्तीस शहाण्णवबारा ह्मणजे ३६×३६=१२९६.

(१०२९)

हरिश्चंद्र—हा पर्वत, त्याच प्रमाणें मंगळगंगा नांवाची नदी, सप्तस्थान, दक्षिणकेदार इत्यादि गोष्टींवरून या ग्रंथाचें लेखन स्थान निश्चित करतां येण्या-सारखें आहे. पण अजून पावेतों या स्थानांच्या आधारें हें ठिकाण निश्चित झालेलें नाहीं.

(१०३४)

दिनप्रति—प्रतिदिन या ऐवजीं दिनप्रति.

(१०३६)

दसाडशत—'दसाउडशत' असा पाठ असावासें वाटतें. आउड ह्मणजे औट किंवा साडेतीन. आउडशत ह्मणजे एकशें साडेतीन व त्याची दसपट ह्मणजे १०३५. या प्रमाणें रचलेल्या ज्या ओंव्या त्या १०३५ रत्नांची माळ वटेश्वरगुरु च्या चरणकमळीं वाहिली; असें रूपक.

